


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष १ लें. ] मकरसंक्रांत शके १८५० [ अंक ४ था.

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



जानेवारी १९२९

# एक शंका

(लेखक :—चिं. गं. भानु)

वेदकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींस ' Nerves (ज्ञानतंतू) ' ही वस्तु ठाउकच होती, असें हल्लीं विद्यमान असलेल्या वैद्यक ग्रंथांच्या टीकांवरून ठाम म्हणतां येत नाहीं. म्हणून माझा नम्र परंतु जोराचा सवाल सर्व लहान-मोठ्या धन्वंतऱ्यांस आहे कीं, त्यांनीं प्रचलित आकृतिविज्ञान शारीरामधून (Anatomy) अथवा प्रकृतिविज्ञान शारीरामधून (Physiology) Nervous system सारखी पाश्चात्य प्रणाली प्रसिद्धपणें काढून दाखवावी. आणि जर कदाचित् महाप्रयत्नांतीं हल्लींच्या वैद्यकांत ती सांपडतच नसेल तर ज्ञानोद्गमाचा आद्यंत शोधून काढणाऱ्या सर्वज्ञकल्प मंत्रद्रष्ट्यांसही Nervous system चा पत्ता लागला नव्हता, असें प्रांजलपणें कबूल करावें.

पाश्चात्य मतान्वयें जगांत सात आश्चर्यें (Wonders) आहेत. श्रुतिमाउलीला Nervous system माहीतच नसेल, तर आठवें आश्चर्य जगांत प्रादुर्भूत झालें असें म्हटलें पाहिजे !

पौरस्त्य आर्यांस Nervous system ठाउक होती किंवा नाहीं हा माझा शंकामूलक प्रश्न आहे.

## शंकेचा उद्भव कसा झाला ?

तैत्तिरीयोपनिषदाचें मराठी भाषांतर करीत असतां 'शिक्षा' अध्यायांतील ६ व्या अनुवाकाच्या पहिल्या मंत्रांतच **स य एषोऽन्तर्हृदय आकाशः ॥ तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः ॥ अमृतो हिरण्मयः ॥ अंतरेण तालुके ॥ य एष स्तन इवावलंबते ॥ सेंद्रयोनिः ॥ यत्रासौ केशांतो विवर्तते ॥ व्यपोह्य शीर्षकपाले ॥** " या शब्दसमूहानें मला आडविलें. हल्लीं जेथें हृदय दाखवितात तेथें उपनिषत्कालीन हृदय नसावें असें मला वाटूं लागलें. श्रीमच्छंकराचार्यांनीं 'हृदयं = पुंडरीकाकारो मांसपिंडः, प्राणायतनः **अनेक-नाडी-सुषिरः** इत्यादि,' असें सांगितलें आहे. हृदयापासून अनेक सहस्र नाड्या निघतात व तेथें ५ सुषिरें (पोकळ्या) आहेत, असें कित्येक उपनिषदें स्पष्ट म्हणतात. (पहा :— कठ, षष्ठ वल्ली; छांदो० ८।६; प्रश्न ३।६; बृह० २।१।१९; मुंडक २।२।४; छां० ३।१३।१ मध्यें 'एतस्य हृदयस्य **देवसुपयः**' हेंही पहा) तात्पर्य हृदयाचें स्थान वक्षस्थळाजवळ आहे, अशी इतरांप्रमाणें **माझी समजूत खोटी** असून उपनिषदुक्त हृदय मस्तकांत आहे असें मला वाटूं लागलें ! पुढें कांहीं काल गेल्यानंतर वे०शा०सं० गंगाधरशास्त्री जोशी, यांनीं मला ज्या मंत्रानें माझी शंका निर्माण केली त्या मंत्राचा अर्थ विचारला; तेव्हां माझ्या अव्यक्त शंकेला व्यक्त स्वरूप आलें. वे० शा० सं० गंगाधरशास्त्री चांगलें व्युत्पन्न असून वैद्यकांत निष्णात आहेत. त्यांनीं मला वैद्यकाची कामापुरती माहिती दिली आणि त्यांनींच माझ्यासाठीं विशेषतः

हृदयाचे स्थलाचा आणि Nervous system चा पत्ता लावण्यासाठीं बहुतेक सर्व ऋग्वेद आणि दशोपनिषदें हे ग्रंथ काळजीपूर्वक चाळले. त्यांनींच हृदयाचें स्थान मस्तकांत आहे ही शंकान्वित समजूत दृढ केली आणि ऋग्वेदांतून व उपनिषदांतून अशीं स्थळें काढून दिलीं कीं तीं पाहून 'मनाचीं सर्व संकल्प–अध्यवसाय–अनुसंधानादि कार्यें हृदयच करतें' हा सिद्धांत स्पष्ट होतो.

## ऋग्वेदांतील सभाष्य उतारे

वे. शा० सं० गंगाधरशास्त्री यांनीं जे अनेक उतारे घेतले आहेत त्यांपैकीं मी ७।८ च घेतों.

मंडल १ सू० ६१ ऋ० २

" हृदा मनसा । " भाष्य–हृदा = हृदयेन । मनसा = तदंतर्वर्तिना अंतःकरणेन । मनीषा = मनीषया = तज्जन्य ज्ञानेन. **हृदयाच्या आंत मन आहे,** असें ह्या मंत्रानें स्पष्ट होतें.

मं० १ सू० ११६ ऋ. १७

**" अन्वमन्यंत हृद्भिः "**

याचा अर्थ हृदयांनीं अनुमोदन दिलें. येथें हृदय हें **अनुमोदनाचें करण** आहे.

मं० १ सू० १४६ ऋ ४

" नाना हृदा " = **बहुप्रकारया बुद्ध्या** । हृद् = बुद्धिः

मं० १ सू० ३२ ऋ० १४

" तव हृदि " **तव चित्ते । हृद् = चित्त**

मं० ३ सू० २६ ऋ० ८

"हृदा" = अंतःकरणवृत्त्या ।

मं० ४ सू० १० ऋ० १

" हृदिस्पृशं " = हृदयंगमम् = अतिशयेन प्रियम् । प्रेम हेंही हृदयांतच.

मं० ४ सू० ५८ ऋ० ६

" अंतर्हृदा मनसा " = हृदयमध्यगतेन चित्तेन ।

मं० ४ सू० ५८ ऋ० ११

" हृद्यंतरा " = सर्व प्राणिनां हृदये ।

आणखीही ऋग्मंडलांतून हवे तितके उतारे देतां येतील. हे पूर्वोक्त मंत्र व इतर मंत्र स्पष्ट सांगतात कीं हृदयाच्या आंत मन–बुद्धि–चित्त आहेत व केव्हां केव्हां हृदयच मनादि होतें, अशी वेदकालीन मंत्रद्रष्ट्यांची व श्री सायणभाष्यकारांची दृढ समजूत होती.

## दशोपनिषदांतील उतारे

ऐतरेय १।४

" हृदयं निरभिद्यत । हृदयान्मनः । मनसः चंद्रमाः "

आधिभौतिक हृदय उत्पन्न झाल्यानंतर त्यापासून आध्यात्मिक मनाची उत्पत्ति झाली आणि त्या मनापासून आधिदैविक चंद्रमा उत्पन्न झाला.

ऐ० २।३

'चंद्रमा मनो भूत्वा हृदयं प्राविशत् ।' अर्थ स्पष्ट आहे.

ऐ० ५।२

'यदेतत् हृदयं, मनश्चैतत् । संज्ञानं आज्ञानं इ० सर्व मन एव ।' हृदय हेंच मन, संज्ञान, आज्ञान, विज्ञान, प्रज्ञान इत्यादि सर्व होय म्हणजे हृदयच होय.

कठ० ६।१४

सर्वे कामाः ये हृदि स्थिताः ।'

कठ० ६।१५

'सर्वे ग्रंथयः हृदयस्य ।'

सर्व काम, वासना, अहंकार हृदयांत असतात.

कठ ६।१६

'शतं च एका च हृदयस्य नाडयः: '

सुषुम्नेसह मनाच्या सर्व नाडया ( शरीरांत ) हजारों आहेत.

कठ० ६।१७

'अंगुष्ठमात्रः पुरुषः....हृदये सन्निविष्टः ।'

जीवांचा अंतरात्मा हृदयांत आहे.

छांदो० ३।१२ व १४

यामध्यें वरीलच सिद्धांत अनुवादिला आहे.

छांदो० ३।१३।१

'.......हृदयस्य पंच देवसुषयः ।'

हृदयांत पांच पोकळ्या (स्वर्गलोक प्राप्तिद्वाराणि–छिद्राणि) आहेत. **या पांच पोकळ्या मस्तकांतील मेंदूमध्यें आहेत, वक्षःस्थळाजवळ दाखविल्या जाणाऱ्या हृदयांत पांच पोकळ्या नाहींत.**

छांदो० ८।६।१

'अथ....हृदयस्य नाडयः ताः पिंगलस्यः अणिम्नः तिष्ठन्ति । शुक्लस्य, नीलस्य, पीतस्य, लोहितस्य...।' हृदयांच्या नाडया पिंगल, शुक्ल, नील, पीत, लोहित अशा विशिष्ट वर्ण असणाऱ्या नाडया सूक्ष्म रसानें भरल्या आहेत. सूक्ष्मः म्हणजे इंद्रियांस अगोचर, अमूर्त, मनोमय.

असेच आणखी अनेक उतारे देतां येतील. तात्पर्य (१) आत्म्याचें स्थान हृदय आहे. (२) तेथून सर्व प्रकारच्या नाड्या निघतात. (३) कामादि विकारांचें स्थान, शब्द, स्पर्श, रूपादि ग्रहण करणाऱ्या नाडया, श्रद्धा, सत्य, वाणी, यांची प्रतिष्ठा, प्राणाचें निवासस्थान, सारांश सर्व आध्यात्म हृदयांत सांठविलेलें आहे.



अनुक्रमणिका

योगशिखोपनिषत्

या उपनिषदांत वरील नाड्या नाभींतून निघतात असें म्हटलें आहे. **ही नाभी म्हणजे हल्लींची 'बेंबी' नव्हे.** कारण तेथून नाडया निघतांना आढळत नाहींत. अर्थात नाभी म्हणजे पृष्ठवंश रज्जु होय. चाकाच्या नाभीपासून सर्व अरा निघतात ( मुं. २।२।४ ) त्याप्रमाणें मस्तकाच्या खालच्या भागापासून माकड हाडा-पर्यंत ताठ उभा असणारा जो पृष्ठवंश तेथून सर्व कर्म प्रचोदक नाडया शरीरभर पसरल्या आहेत आणि कांहीं शरीराच्या कर्ण, नेत्र गोलकादि पासून निघून मस्तकांतील मज्जे-कडे जाणाऱ्या ज्ञानवाहक नाडया पसरल्या आहेत. मज्जातंतूचें जाळें मस्तक (पृष्ठवंशही) व्यापून राहिलें आहे. असो. ज्याला मस्तिष्क म्हणतात, आणि ज्याच्या स्फूर्तीनें जीवाचे ज्ञानकर्मादि व्यापार चालतात, ज्यांना आध्यात्मिकतः मन (मन, बुद्धि, चित्त, अहंकार) म्हणतां येतें, त्या मस्तिष्काचें (मनाचें) हृदय हें आयतन, निवासस्थान आहे. हें हृदय मस्तकांत आहे, वक्षस्थळाशेजारीं नाहीं हें तैत्तिरीय उपनिषदानें सुचविलें आणि वेदांत व उपनिषदांत सांगितलेल्या कार्यावरून पाहतां हृदय म्हणजे मन आणि तें मन मस्तकांतील पांच पोकळ्या असून पुंडरीकाकार असणाऱ्या हृदयांत आहे आणि अन्नाचा अत्यंत सूक्ष्मतम भाग ( विकार, विचार, श्रद्धा प्रभृति ) हृदयांत म्हणजे मस्तकांत शिरतो, इत्यादि इत्यादि वरून हृदय मस्तकांतच आहे. आणि त्याच हृदया-पासून इडा, पिंगला, सुषुम्ना प्रभृति ७२००० नाडया सर्व शरीरभर ( शांकरभाष्य छां० ८।६।१ ) आहेत. म्हणून हृदय मस्तकांत आहे आणि यांस नाडया असें उप-निषदांनीं म्हटलें त्यां बहुतेक Nerves होत ही शंका बद्धमूल झाली.

श्रीमद्भगवद्गीतेंतही 'हृदयदौर्बल्यम्' 'हृदि संन्निविष्टः' 'ईश्वर..........हृद्देशे तिष्ठति' असें म्हणून वेदोपनिषदांचाच अनुवाद केला आहे.

योगवासिष्ठ उपशमप्रकरण, सर्ग ७८ श्लोक ३३।३४।३५।३६

...हृदयं द्विविधं स्मृतम् ।
उपादेयं च हेयं च..........शृणु ॥ ३३ ॥
इयत्तया परिच्छिन्ने देहे यद्वक्षसोन्तरम्
**हेयं तद्हृदयं विद्धि** तनौ एकतटे स्थितम्
**संविन्मात्रं तु हृदयं उपादेयं**......
तत्तु प्रधानं हृदयं... ... ।
तदादर्शः पदार्थानां तत्कोशः सर्वसंपदाम् ॥ ३६

अर्थ स्पष्ट आहे. आणखी विचार व चरकसुश्रुतादि आदिकालीन वैद्यकांत काय म्हटलें आहे, त्याचा उल्लेख व विचार पुढील अंकीं करीन.

---

## योगशिखोपनिषत्

या उपनिषदांत वरील नाड्या नाभींतून निघतात असें म्हटलें आहे. ही नाभी म्हणजे हल्लींची 'बेंबी' नव्हे. कारण तेथून नाडया निघतांना आढळत नाहींत. अर्थात नाभी म्हणजे पृष्ठवंश रज्जु होय. चाकाच्या नाभीपासून सर्व अरा निघतात ( मं. २।२।४ ) त्याप्रमाणें मस्तकाच्या खालच्या भागापासून [illegible]

| देश | लोकसंख्या | उत्पन्न | उत्पन्न रुपयांत | लष्करी खर्च (रु |
|---|---|---|---|---|
| ऑस्ट्रिया | ६५,३४,४८१ | ११,१०,६६६,०००<br>शिलिंग = ६ आणे | ४१,६४,९९,७५० | २,५३,०८,० |
| बेलजम | ७७,४४,२६० | ६१७,५०,००,०००<br>फ्रँक = २ आणे | ७७,१८,७५,००० | ८,४५,००,० |
| चेको-स्लोव्हॅकिया | १,३६,१३,००० | १००७,८०,००,०००<br>कॉरूना = ९ आणे | ५६६,८८,७५,००० | १०४,५६,८७,५ |
| फ्रान्स | ४०,७,९०,००० | ३९३१,२०,००,०००<br>फ्रँक = २ आणे | ४९१,४०,००,००० | ८५,५५,००,० |
| जर्मनी | ६,३१,८०,६२० | ९४०,४०,००,०००<br>राइशमार्क = ८ आणे | ४७०,२०,००,००० | ३५,३५,००,० |
| ग्रेटब्रिटन | ४,३८,००,००० | ७७,०१,५०,०००<br>पौंड = १३ १/३ रुपये | १०२६,८६,६६,६६६ | १३९,२२,६६,६६ |
| इटली | ४,०२,४०,००० | १९४३,४०,००,०००<br>लायर = ८ आणे | ९७१,७०,००,००० | २११,५५,००,० |
| स्पेन | २,२२,९०,१६२ | २५७,९०,००,०००<br>पिसीटा = ८ आणे | १२८,९५,००,००० | ४०,७५,००,० |
| स्विझर्लंड | ३१,५९,००० | ३४,७०,००,०००<br>गोल्ड फ्रँक = १० आणे | २१,६८,७५,००० | ५,२५,००,० |
| सोव्हिएट प्रजासत्ताक राज्य (रशिया) | १४,७०,१३,००० | ५००,००,००,०००<br>रूबल = १ १/२ रुपाया | ७५०,००,००,००० | १०३,८०,००,० |
| जपान | ६,१०,८१,९५८ | १५४,९८,१४०००<br>येन = १ १/४ रुपाया | १९३,७२,६७,५०० | २१,३५,९४,२३ |
| युनायटेड स्टेट्स | ११,२७,८६,००० | ३७८,०१,५८,६८४<br>डॉलर = ३ रुपये | ११३४,०४,४६,०५२ | २१०,००,००,० |
| हिंदुस्थान | ३१,८९,४२,४८० | — | १२५,२५,६५००० | ५६,७२,४९,० |

# हिंदुस्थानची इतर देशांशीं तुलना.

| …ण खर्च (रुपये) | राज्यकारभार खर्च (रुपये) | आयात (रुपये) | निर्यात (रुपये) | कर्ज (रुपये) |
|---|---|---|---|---|
| ,५००,८६,६२५ | २,७१,३८,३७५ | १०५,४१,२५००० | ६५,२८,७५००० | ८१,७५,००,००० |
| ,४७०,५०,००० | × | २८,७५,००० | २४,३७,६१८ | ६३६,२५,००,००० |
| ,३००,००,००० | ३८,८६,८७,५०० | ८५९,३३,१२,५०० | १००४,४५,६२,५०० | २८६३,१२,५०,००० |
| ,८३३,७५,००० | ७,४१,२५,००० | ७४३,९२,५०,००० | ७४४,१८,७५,००० | ५८५०,००,००,००० |
| ०००,००,००० | × | ५३०,८५,००,००० | ४९०,९५,००,००० | ११५,९०,००,००० |
| १११,७३,३३३ | × | १६२५,८४,९२,३३३ | ११०९,५५,७३,३३३ | १०१७७,३३,३३,३३३ |
| ४००,००,००० | ५३,०५,००,००० | १३०८,६५,००,००० | ९१२,८०,००,००० | ४७०१,९०,००,००० |
| १००,००,००० | ८,२५,००,००० | १०७,६५,००,००० | ८०४,२५,००,००० | ९७०,८०,००,००० |
| ४३३,७५,००० | ५०,००,००० | ८१,२५,००,००० | ६७,५०,००,००० | १४०,९३,७५,००० |
| × | १०४,५५,००,००० | ५३,४०,००,००० | ४८,००,००,००० | ६५,५५,००,००० |
| ९, २,९२२ | × | २५४,१६,८१,२५० | २०७,०२,३५,००० | ६२४,६४,५६,९०० |
| × | ३७०,१५,९७,००० | ११४७,२४,२०,४२० | १४५९,४४,९४,३७७ | ६१५४,८८,१६,५२५ |
| ०,००,००० | ११,३१,३९,००० | २८२,४४,५४,५१३ | ३१३,२६,१७,७०४ | १०२४,००,००,००० |

### योगशिखोपनिषत्

या उपनिषदांत वरील नाड्या नाभींतून निघतात असें म्हटलें आहे. **ही नाभी म्हणजे हल्लींची 'बेंबी' नव्हे.** कारण तेथून नाडया निघतांना आढळत नाहींत. अर्थात नाभी म्हणजे पृष्ठवंश रज्जु होय. चाकाच्या नाभीपासून सर्व अरा निघतात ( मं. २।२।५ ) त्याप्रमाणें मस्तकाच्या खालच्या भागापासून [illegible]

# हिंदुस्थानची इतर देशांशीं तुलना.

( लेखक :— वामन नारायण गोडबोले )

सोबतच्या कोष्टकांत जगांतील प्रमुख देशांचे आंकडे, कांहीं विशिष्ट बाबींत हिंदुस्थानाशीं तुलना करण्याच्या हेतूनें दिलेले आहेत. हिंदुस्थानची प्रगतीच्या दृष्टीनें काय स्थिति आहे हें या तुलनेपासून स्पष्ट होणार आहे. प्रगतीचे व संपत्तीचे मुख्य अवयव देशाचें उत्पन्न, आयात व निर्यात माल यांची वृद्धि व शिक्षणावरील खर्च हे या तुलने-करितां संकलित केलेले आहेत. त्यांवरून आमची खरोखरी प्रगति चाललेली आहे किंवा आम्हीं अद्यापि ब्रिटिश अमदानीच्या दीडशें वर्षांनंतर जगतांतील कनिष्ठ देशा-च्याही मागें आहोंत हें एकदां कळून येईल व त्याप्रमाणें पुढील मार्ग आंखण्यास सोईचें पडेल. उत्पन्नाची तुलना करितां असें दिसून येतें कीं सर्वांमध्यें युनायटेड स्टेट्स व इंग्लंड यांनीं अनुक्रमें पहिली व दुसरी जागा घेतलेली आहे. फ्रान्स व जर्मनीचें उत्पन्न जवळ जवळ सारखेंच आहे. जपानसारख्या अगदीं अलीकडील काळांत पुढें आलेल्या देशाचेंही उत्पन्न आमच्या देशांतील उत्पन्नापेक्षां बरेंच जास्त आहे. हिंदुस्थानपेक्षांही कनिष्ठ असलेला एकच देश यूरोपांत आहे आणि तो स्पेन हा होय. तेथील लोक आमच्यासारखेच आळशी आहेत हें एक या निर्धनऐचें मुख्य कारण आहे. स्विझर्लंडचें उत्पन्न फारच कमी आहे हें खरें परंतु त्या देशाची लोकसंख्या बत्तीस लक्षांपेक्षां कमी आहे, हें लक्ष्यांत ठेवलें असतां तें उत्पन्न फारच चांगलें आहे. हिंदुस्थानच्या एक शतांश लोकसंख्या असूनही स्विझर्लंडचें उत्पन्न जवळ जवळ एक पंचमांश आहे.

लष्करी खर्चांची तुलना करितां असें दिसून येतें कीं, सर्वांत अधिक लष्करी खर्च युनायटेड स्टेट्स या देशाचा आहे. व त्याचे खालोखाल इटलीचा आहे; त्याच्याच खालची जागा इंग्लंडनें घेतली आहे. इंग्लंड व युनायटेड स्टेट्स यांच्या खर्चाचें मुख्य कारण त्यांच्या आरमाराच्या विस्तृतपणांत सांपडतें; वस्तुतः सैन्यावरील खर्च या दोनही देशांत कमी आहे. उत्पन्नाशीं प्रमाण या दृष्टीनें पहातां यु. स्टे. चा लष्करी खर्च २०% आहे. इंग्लंडचा १४% आहे व हिंदुस्थानचा ५०% आहे. यावरून निर्धन देश असून हिंदुस्थानावर लष्करी खर्चाचें वजन किती मोठें पडत आहे याची कल्पना होईल. वारंवार युद्धांत पडण्याचे प्रसंग यावयाचे अशी स्थिति फ्रान्स देशाची असतां तेथेंही १७% पेक्षां जास्त लष्करी खर्च नाहीं. जर्मनीचा तर सध्यां विचारच करण्यास नको. कारण तेथें एक लक्षावर सैन्य ठेवण्याची मनाई आहे. देशाच्या विस्ताराच्या मानानें चेको–स्लोव्हॅकिया देशाचा खर्च १०४ कोटि म्हणजे जवळ जवळ हिंदुस्थानच्या दुप्पट आहे यावरून तेथील सरकार युद्धप्रवण आहे हें स्पष्ट होतें. जपानचें बरेंच मोठें

आरमार असूनही त्या देशाचा लष्करी खर्च अगदींच मर्यादित व स्विझर्लंड, ऑस्ट्रिया व बेल्जम सोडून सर्व देशांपेक्षां कमी आहे. यावरून स्वराज्यामध्यें पुष्कळ सैन्य ठेऊनही किती थोडक्या खर्चांत सर्व आटोपतां येतें हें दिसून येईल.

आतां यापेक्षां महत्वाची बाब जी शिक्षण त्याचा विचार केला पाहिजे. जर्मनीचा खर्च अतिशय कमी दिसण्याचें कारण असें कीं तेथील मध्यवर्ति सरकार शिक्षणावर विशेष खर्च करीत नाहीं. बहुतेक खर्च स्थानिक राज्यें व त्यांतील स्थानिक संस्था यांच्या हातून होतो व तो या आकड्यांमध्यें अंतर्गत न केल्यामुळें दाखविला जात नाहीं. युनायटेड स्टेट्स येथील शिक्षणाचे आंकडे उपलब्ध नाहींत; कारण ते सरकारी पुस्तकांत दिलेले नसतात. बाकीच्या देशांमध्यें इंग्लडचा शिक्षणखर्च सर्वांत अधिक आहे. त्याच्याच मागोमाग इटलीचा आंकडा आहे; यावरून फॅसिस्टराज्यपद्धति शिक्षणाविषयीं बरीच आस्था दाखविते हें स्पष्ट दिसतें. उत्पन्नाशीं शेंकडा प्रमाण या दृष्टीनें पाहतां इंग्लंडचा शिक्षणखर्च ७% आहे व इटलीचा ६·७% आहे. हिंदुस्थान देशाशीं तुलना करण्यापूर्वी मध्यवर्ति सरकारच्या १२५ कोटि उत्पन्नांत अदमासें ७० कोटि स्थानिक सरकारांच्या उत्पन्नाबद्दल मिळविले पाहिजेत कारण शिक्षण हें सोंपीव खातें असल्यामुळें हा सर्व खर्च स्थानिक उत्पन्नांतून होतो. या एकंदर १९५ कोटि उत्पन्नाशीं गुणोत्तर काढिलें असतां हिंदुस्थानांतील शिक्षणखर्च शेंकडा ६% ही पडत नाहीं. हा देश जपानच्या पांचपट लोकसंख्या असूनही जवळ जवळ जपान इतकाच खर्च शिक्षणावर करतो यावरून आम्ही किती मागसलेले आहों हें निर्विवाद स्पष्ट होतें.

राज्यकारभारखर्च बऱ्याच देशांत अनुपलब्ध असल्यामुळें त्याविषयीं विशेष तुलनात्मक लिहितां येत नाहीं. तथापि दिलेल्या आंकड्यांवरून कांहीं अनुमानें काढलीं आहेत. सोव्हिएट राज्याचा राज्यकारभारखर्च फारच फुगलेला दिसतो. याचें कारण समाजसत्तावादास अनुकूल अशी राज्यरचना तेथें आहे हें असलें पाहिजे. सर्वच गोष्टी सरकारी; अर्थात् सरकारी नोकर इतर देशांपेक्षां पांचपट किंबहुना दहापट असले पाहिजेत. युनायटेड स्टेट्सचाही खर्च बराच मोठा आहे. हिंदुस्थानांतील एकंदर खर्चाच्या जवळ जवळ तिप्पट या देशांतील राज्यकारभारखर्च आहे. चेको-स्लॉव्हॅकियाची दीड कोटि प्रजा असूनही तेथील राज्यकारभारखर्च हिंदुस्थानच्या राज्यकारभारखर्चाच्या तिप्पटीहूनही अधिक आहे असें दिसतें.

आयात व निर्यात माल यांची वृद्धि ही व्यापाराच्या भरभराटीची द्योतक आहे हें निर्विवाद आहे. फक्त आयात माल निर्यात मालापेक्षां जास्ती असल्यास त्याचें जास्त देणें देण्याकरितां, व्याज, जहाजांतून माल नेण्याबद्दलचें भाडें व बँकांच्या व्यवहारासंबंधींचें कमिशन इत्यादि मार्गांनीं अशा देशास इतर देशांपासून पुष्कळसें येणें असलें पाहिजे. नाहीं तर अशी स्थिति अपायकारक असते. आयातीच्या आकड्यांकडे दृष्टि फेंकली असतां असें दिसून येतें कीं सर्व जगांत इंग्लंडचा आयात माल सर्वांत अधिक

आहे. त्याच्या खालीं इटली व त्याच्या खालीं यु. स्टेट्स हे आहेत. इंग्लंडचा आयात माल निर्यात मालापेक्षां अदमासें ५०० कोटि रु. नीं अधिक आहे; त्याचप्रमाणें इटलीचा आयात माल ४०० कोटि रुपयांनीं अधिक आहे. याच्या उलट यु. स्टेट्सचा निर्यात माल अदमासें ३०० कोटि रुपयांनीं अधिक आहे. एवढयाचवरून यु. स्टेट्स हा देश अधिक संपन्न आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि बहुतकरून असा देश धनको असतो; कारण निर्यात मालाबद्दल अधिक आलेल्या पैशाचा इतर देशांतील कर्जरोखे व सिक्यूरिटी विकत घेण्याकडे असा देश विनियोग करतो. अशाच तऱ्हेची स्थिति स्पेन देशाची; त्या देशाचा निर्यात माल आयात मालापेक्षां जवळ जवळ ७०० कोटि रुपयांनीं अधिक आहे. हिंदुस्थानदेशही या कोटींत पडतो. परंतु त्याला ऋणरूपी राहूची पीडा असल्या-मुळें हा अधिक येणें असलेला पैसा पुन्हां व्याजाच्या रूपानें बराचसा नाहींसा होतो. एकंदर हिशेब करितां २० कोटि रुपये मिळाले म्हणजे भाग्य समजावें. वर दिलेल्या आंकड्यांत हिंदुस्थानची निर्यात ३१ कोटि रुपयांनीं अधिक आहे व 'होम चार्जेस' अद-मासें ४० कोटि रुपयांचे आहेत; अर्थात् या सालीं हिंदुस्थानास व्यापारापासून कांहींएक फायदा झाला नाहीं इतकेंच नव्हे तर उलट ९ कोटींचें नुकसान झालें. परंतु दर वर्षी असें होत नाहीं. चेको—स्लोव्हेंकिया देशाचा निर्यात माल आयात मालापेक्षां अदमासें १५० कोटि रुपयांनीं अधिक आहे. एकंदर सर्व दृष्टींनीं विचार करितां या देशाची फारच समाधानकारक स्थिति निदर्शनास येते. पूर्वीं या देशाचा बराचसा भाग ऑस्ट्रि-याच्या साम्राज्यांत मोडत असे परंतु तो महायुद्धापासून स्वतंत्र झाला आहे.

सरकारी कर्जाचे आंकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं सर्व देशांत इंग्लंडचें कर्ज अधिक आहे. त्याच्या खालोखाल युनायटेड् स्टेट्सचें आहे व जवळ जवळ तितकेंच फ्रान्सचें आहे. महायुद्धांत या तीनही सरकारांनीं प्रमुख भाग घेतल्यामुळें यांना बरेंच कर्ज करावें लागलें. युनायटेड स्टेट्सची स्थिति अशी आहे कीं जरी त्या देशास देणें आहे तथापि इतर देशांनीं त्या देशाकडून त्याच्या पुष्कळ पटीनें कर्ज घेतलें आहे. त्यामुळें देण्याचें कर्ज व घेण्याचें कर्ज यांचा एकंदर आढावा काढल्यास तो देश धनको आहे असेंच आढळून येतें. इंग्लंड देशालाही इतर देशांकडून पुष्कळ घेणें आहे, परंतु ते देश इंग्लडचें कर्ज देण्यास आजमित्तीस तयार नाहींत किंबहुना हें कर्ज माफ व्हावें अशाविषयीं त्यांनीं राष्ट्रसंघामार्फत प्रयत्न चालविले आहेत. इतकें असूनही इंग्लंडनें आपलें स्वतःचें कर्ज व त्यावरील व्याज देण्याची उत्तम व्यवस्था केली आहे ही तारीफ करण्यासारखी गोष्ट आहे. या कारणामुळें इंग्लंडांतील कर इतके बेसुमार वाढले आहेत कीं त्या करांमुळें व्यापारास लागणारें भांडवलही कमी कमी होत चाललें आहे. कर्जाचें एकंदर उत्पन्नाशीं प्रमाण काढलें असतां पुढीलप्रमाणें आंकडे मांडतां येतील; यु. स्टेट्स ५५०%; इंग्लंड १०००%; फ्रान्स १२०%; चेको-स्लोव्हेंकिया ५००%; इटली ५००%; जपान ३५०%; हिंदुस्थान ८००%. प्रत्यक्ष लढाईत फार खर्च न करतांही हिंदुस्थानचें कर्ज उत्पन्नाच्या आठपट आहे; यापैकीं निम्में कर्ज मात्र

रेल्वे, पाटबंधारे इत्यादिकांकरितां असल्यामुळें उत्पादक आहे. कारण या कर्जावर द्यावें लागणारें व्याज त्या खात्यांच्या शिलकींतून देण्यास सवड सांपडते. यूरोपांतील सरकारी कर्जाकडे पाहतां तेथील लोक व सरकार हीं कर्जाविषयीं अत्यंत बेफिकीर आहेत असें दिसून येतें. कर्जाची मूळची रक्कम परत देण्याविषयीं फार थोडया देशांत तरतूद केली असते. कर्जाचें व्याज दिलें म्हणजे आपली जबाबदारी संपली अशी कल्पना सर्वत्र रूढ झाली आहे. हल्लीं इंग्लंड देशांत व्याज देण्याकरितां अदमासें ४०० कोटि रुपये दरसाल कराच्या रूपानें पैदा करावे लागतात व या डोईजड करांचा व्यापारावर अनिष्ट परिणाम होतो. सोव्हिएट सरकारचें कर्ज सर्वांत कमी आहे याचें कारण त्यांनीं दिवाळें काढून पूर्वींच सर्व देणें नाकबूल केलें आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं त्या देशाशीं व्यापार करण्यास इतर देशांना धीर होत नाहीं व त्याचमुळें रशियाची प्रगति फार मंदगतीनें चालली आहे.

दर माणशीं उत्पन्नाचे आंकडे कांहीं देशांविषयीं उपलब्ध आहेत ते पुढील-प्रमाणें:— युनायटेडस्टेट्स् ७५० (रुपये); ग्रेटब्रिटन ३५०; कॅनडा ८२०; स्विझर्लंड ६११; ऑस्ट्रेलिया ४६५; फ्रान्स ३५१; जर्मनी ३२५; बेलजम ३६५; हॉलंड ३००; जपान १३०; हिंदुस्थान ६०; चीन २५.

---

# शास्त्रीय परिभाषा

लेखांक ३ रा.

लेखकः—कृष्णाजि विनायक वझे.

हिंदु लोकांच्या शास्त्रांची सामान्य मांडणी कशी आहे व पारिभाषिक शब्दांचीं लिंगें वगैरे गोष्टी कशा ठरविण्यांत येतात हें मागील दोन लेखांत पाहिल्यावर आपण आतां कांहीं पारिभाषिक शब्दांचा सविस्तर विचार उदाहरणासाठीं करूं. यासाठीं अंक, अंग, गुण व पद असे चार शब्द आजच्या लेखांत विचारासाठीं घेतले आहेत.

**अंक.**

अंक हा शब्द अंक् खूण करणें या धातूपासून निघाला असून त्याचा निरनिराळ्या शास्त्रांत खालीलप्रमाणें उपयोग केला आहे.

**वेदांत**—वेदांतशास्त्रांत निर्गुण ब्रह्मांत जो विकार होऊन सृष्टि झाली या विकाराला अंक असें म्हणतात. ज्याला कोणतीहि खूण नाहीं तें अनिर्वचनीय ब्रह्म व त्या ठिकाणीं विकार होऊन जी सृष्टि उत्पन्न झाली ती 'अंकित' होय. विकार हा एक डाग असून असा डाग लागलेलें जें ब्रह्म तें अंकित ब्रह्म म्हणजे जग.

**योग**—योगशास्त्रांत अंक म्हणजे दोष. दोषानें युक्त तें अंकित. विषयरूपी दोष ज्या चित्तांत आहेत तें विषयांकित चित्त होय.

**भाषा**—भाषाशास्त्रांत अंक म्हणजे ठसा. अंकित म्हणजे ठसा उठविलेला, सही केलेला पदार्थ. प्रत्येक माणसाची कांहींतरी खूण ठरलेली असते. आज सुद्धां निशाणी नांगर, हतोडा, सुईदोरा, पळी अशा निरानिराळ्या धंदेवाल्यांच्या निशाण्या खुणा म्हणून आहेत. या निशाण्यांपासूनच लिहिण्याला सुरवात झाली.

**गणीत**—गणीतशास्त्रांत अंक म्हणजे आंकडे. पूर्वी आपल्या मालकीच्या जनावरें वगैरे वर खुणा करण्यात येत. पहिल्यानें नुसतें थोडें फार असें अनिश्चित प्रमाण सांगण्यांत येई, नंतर 'संख्यान' म्हणजे दहा, शंभर, हजार अशा ठोकळ मानानें सांगत व शेवटीं अक्का पंधरा अशी नक्की 'गणना' करण्यांत येऊं लागली. लक्षावधि म्हणजे लक्ष या मापानें मोजतां येण्याइतके. रोमन अंक हातांचे बोटांवरून व आपले अंक बोटांच्या पेरांवरून निघालेले आहेत.

**धर्म**—धर्मशास्त्रांत 'अंक' म्हणजे कलंक. चोर वगैरे गुन्हेगारांना ओळखतां यावें म्हणून प्राचीन काळीं कपाळावर डाग देत असत. निरनिराळ्या गुन्हेगारांना निरनिराळे डाग देण्याची माहिती धर्मशास्त्रांत व कौटिलीय अर्थशास्त्रांत दिली आहे.

**विज्ञान**—विज्ञानशास्त्रांत जिनसांचें विशिष्टगुरुत्व वगैरे गुण दाखविणारे सापेक्ष आंकडे असतात त्यांना 'अंक' म्हणतात. कठीणपणांतहि ज्याचा पहिला अनुक्रम लागेल त्या मानानें इतर वस्तूंचे अनुक्रम लावतात व त्यांत कठीणपणा सांगतात. विद्युतशास्त्रांत धन ऋण उत्पन्न करणाऱ्या धातूंचे असेच अनुक्रम आहेत.

**रसायन**—रसायनशास्त्रांत जिन्नस एकमेकांशीं कोणत्या प्रमाणांत मिसळतात त्याला त्या वस्तूंचें 'अणु प्रमाण' म्हणतात. या अंकांत उदान वायूची पाहिली जागा आहे. सर्वात हलका वायू हा असून इतर जिन्नस याच्या कोणत्या तरी पटीनें आहेत. यांना प्रेमांक म्हणतात.

**यंत्र**—यंत्रशास्त्रांत ताण सोसण्याच्या शक्तीचे अनुक्रम आहेत. उभा दाब सोसणारे अंक पुल्लिंगी, आडवा ताण सहन करण्याच्या शक्तीचे अंक स्त्रीलिंगी व पीळ सोसण्याचे अंक नपुंसकलिंगी सांगतात म्हणजे ओळख सहज पटते.

**ज्योतिष**—ज्योतिषशास्त्रांत तिथींचे अनुक्रमांक आहेत. ग्रहांच्या विशिष्टगुरुत्वाचे अंक आहेत. पृथ्वी व तिच्या कक्षेच्या आंतील ग्रहांना स्त्रीग्रह व तिच्या बाहेरील ग्रहांना पुरुष ग्रह म्हणतात. नक्षत्रांच्या तेजावरून त्यांच्या प्रती लावतात; रंगावरून 'वर्ण' सांगतात.

**वैद्यक**—वैद्यकशास्त्रांत वात, पित्त व कफ असे त्रिदोष सांगितले आहेत. वात पुल्लिंगी, कफ स्त्रीलिंगी व पित्त नपुंसकलिंगी आहे. या शास्त्रांत अंकांचा उपयोग कसा करतात ठाऊक नाहीं.

**शिल्प**—शिल्पशास्त्रांत अंकांचा उपयोग पुष्कळ आहे. वस्तूंचे गुण दाखविणारे 'नेत्रांक' व दोष सांगणारे 'अरिष्टांक' आहेत. आधुनिक पद्धतीच्या हत्यारांनाहि अंक आहेत. उ० स्क्रूंना अंक आहेत. एका इंचांत किती पेंच यावर हे अंक असतात. बिजाग यांना अंक असतात. बिजागरीची लांबी, रुंदी व जाडी दाखविणारे हे अंक असतात. शंभर नंबरी, सोळामाशी किंवा बावनकशी असे सूत, जर, सोनें वगैरेंचे अंक सांगण्यांत येतातच. कापडांत सुद्धां उभे धागे व आडवे धागे, सूत व रेशीम, रेशीम व जर यांचीं प्रमाणें सांगणारे आंकडे वापरतात.

**समाज**—समाजशास्त्रांत माणसांचे 'वर्ण' नांवाचे वर्ग आहेत. शरीररचनेला अनुसरून लिंगें आहेत. अक्कामासी, दहामासी असे संकर दाखविणारे आंकडे आहेत. लश्कर, पोलीस, गाड्या, डबे, मैल, खांब वगैरेंना अनुक्रमांक असतात. तात्पर्य व्यवहाराच्या सोईसाठीं रस्ते, आळ्या, घरें, खोल्या, कचेऱ्यांतील फेरिस्ते, वाचनालयांतील ग्रंथ, ग्रंथांतील अध्याय, पानें, ओळी, अक्षरें वगैरेंना अनुक्रमांक दिलेले असतात.

याप्रमाणें अंक म्हणजे विशिष्ट गुण किंवा दोष यांत जिनसेची प्रतवारी दाखविणारा आंकडा होय. कित्येक गोष्टींत लहान आंकडा श्रेष्ठत्वदर्शक असतो तर कित्येक बाबींत मोठा आंकडा श्रेष्ठत्वदर्शक असतो. बहुतकरून लहान आंकडा प्रतवारी व मोठा आंकडा अंगीं असलेले गुण दाखवितो. नाटकांत एका काळीं पण निरनिराळ्या जागीं झालेल्या गोष्टी दाखविणाऱ्या भागाला 'अंक' म्हणतात व निरानिराळ्या जागच्या गोष्टी सांगणाऱ्या भागाला 'प्रवेश' म्हणतात.

## अंग

कोणत्याहि वस्तूच्या अवयवाला तिचें अंग म्हणतात. एका वस्तूची बहुधा सहा अंगें समजलीं म्हणजे तिचें पूर्ण स्वरूप कळतें. घनपदार्थाला कमींत कमी चार तरी अंगें असतात.

**वेदांत**—वेदांताच्या अंगांना 'दर्शनें' म्हणतात. हीं सहा आहेत. वेदाचींहि सहाच अंगें आहेत. या सहा अंगांच्या योगानें वेदाचा अर्थ चांगला समजतो. दर्शनें म्हणजे विचार करण्याच्या पद्धति. या प्रत्येक पद्धतीनें विचार करीत गेलें म्हणजे अखेर परमात्म्याचें 'दर्शन' होतें म्हणून यांना दर्शनें म्हणतात.

**योग**—योगांत परमेश्वरदर्शन होण्यासाठीं ज्या गोष्टी कराव्या लागतात त्यांना 'अंग' म्हणतात. योगाचीं अशीं आठ अंगें आहेत. या आठहि क्रिया बरोबर करतां आल्या म्हणजे परमेश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होतो. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि. हींहि अंगें होत.

**भाषा**—भाषेचीं चार अंगें आहेत. नाम, आख्यात, उपसर्ग व निपात हीं तीं चार अंगें होत.

**गणीत**—गणिताचीं आठ अंगें आहेत. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ, घन घनमूळ अशीं हीं आठ अंगें आहेत. यांना परिकर्माष्टक म्हणतात.

धर्म—धर्म माणसांचे चार प्रकार करून त्यांना त्यांच्या योग्य असे चार मार्ग सांगतो म्हणून चतुरंग आहे. यांना मार्ग म्हणतात. कर्म, भक्ति, योग व ज्ञान असे चार मार्ग आहेत.

विज्ञान—विज्ञानांत कोणत्याहि वस्तूच्या सात अंगांचें विवरण असतें म्हणून त्याला सप्तांग म्हणतात. हीं सात अंगें म्हणजे वर्ण (रंग), गंध (वास), रस (चव), आकार (आकृति), दिक् (ढाळ), शब्द (आवाज) स्पर्श अशीं आहेत.

यंत्र—यंत्रशास्त्र पंचांग आहे. दंड, चक्र, दंत, सरणी व भ्रम अशीं यंत्राचीं पांच अंगें आहेत. या पांचांच्या संयोगानें कोणतेंहि यंत्र होत असतें.

ज्योतिष—ज्योतिःशास्त्र पंचांगच आहे. वर्ष, मास, दिवस, काल व समय अगर तिथी, वार, नक्षत्र करण आणि योग अशीं ज्योतिःशास्त्राचीं पांच अंगें समजण्यांत येतात.

वैद्यक—वैद्यकशास्त्र अष्टांग आहे असें म्हटलें आहे.

चतुरंगं तु स्थापत्यं चाष्टांगं तु चिकित्सितं ॥
धनुर्वेदस्तुसप्तांगः ज्योतिःपंचांगमुच्यते ॥

परंतु वैद्यकशास्त्राचे निरनिराळे भाग निरनिराळ्या अंगांचे आहेत. त्यांत मुख्य जें औषधी शास्त्र तें पंचांग आहे. रस, गुण, वीर्य, विपाक व शक्ति अशीं हीं औषधी द्रव्यांचीं पांच अंगें आहेत.

शिल्प—शिल्पशास्त्र चतुरंग आहे असें वर आलेंच आहे. परंतु याचे सुद्धां निरनिराळे भाग निरनिराळ्या अंगांनीं युक्त आहेत व निरनिराळे ग्रंथकार या निरनिराळ्या भागांवर जास्त जोर देत असल्यामुळें शिल्प तितक्या अंगी आहे असें ते म्हणतात. धातु (सामान), साधन (वाहतूक), वास्तु (घडण) व प्रसाद (सौंदर्य) अशीं शिल्पाचीं चार अंगें मानण्यांत येतात. योजना, मांडणी, बांधकाम, लाकूडकाम, धातुकाम, रंगरंगोटी, आवार व सौंदर्य अशीं शिल्पाचीं आठ अंगेंहि सांगतात.

समाज—समाजशास्त्र चतुरंग आहे. चार वर्ण, चार आश्रम, चार अवस्था, चार प्रकार असे समाजाचे चार चार भागच फार आहेत.

या शिवाय कोणत्याहि वस्तूचें निश्चित ज्ञान होण्यास तिच्या संबंधाच्या ज्या गोष्टी ठाऊक असाव्या लागतात त्यालाहि शास्त्रकार अंग असें म्हणतात. हीं अंगें खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

| वस्तूचें नांव | माहिती देणारीं अंगें |
|---|---|
| समाज | बुद्धि, शौर्य, व्यापार, शेती मजुरी |
| मनुष्य | विचार, उच्चार, आचार, प्रचार, संचार |
| पशु | खूर, शिंगें, दांत, कणा, शेंपूट |
| वनस्पति | मूळ, खोड, पान, फूल, फळ |
| घर | पाया, ओतें, भिंती, दारें, छप्पर |
| जागा | जमीन, पाणी, हवा, पाऊस, प्रकाश |
| नगर | प्रपा, मंडप, आपण, राजवरालय, सर्वजनवास, स्मशान, वनोपवन, देवालय, रक्षक |
| जग | ब्रह्म, अदिति, सूर्य, ग्रह, चंद्र. |
| संस्कार | जन्म, उपनयन, विवाह, मरण, श्राद्ध |

## गुण.

गुण म्हणजे दोरी या अर्थापासून या शब्दाच्या विस्ताराला प्रारंभ होतो.

**वेदांत**—या शास्त्रांत सत्व, रज, व तम असे तीन गुण मनुष्याला बांधून टाकणारे म्हणून सांगितले आहेत. मोक्षाला प्राप्त करून घेतांना या तिन्ही बंधनांतून सुटून गुणातीत व्हावें लागतें. ब्रह्म निर्गुण आहे परंतु त्यांत गुणांचा विकार उत्पन्न झाला म्हणजे जग उत्पन्न होतें. या जगाचें कोडें उलगडण्यास या गुणांची कास धरावी लागते.

**योग**—या शास्त्रांत गुणांचा वेदांताप्रमाणेंच उपयोग होतो.

**भाषा**—या शास्त्रांत स्वरांना 'गुण' होतो. ए व ओ हे मुख्य गुणस्वर होत.

**गणीत**—या शास्त्रांत 'गुण' म्हणजे पट करणें. पट (कापड) यांत जसे दोरे एका शेजारीं एक घेऊन विणले असतात त्याप्रमाणें संख्या एकांतएक मिळवून जी एकुणात होते ती 'पट' होय व या क्रियेला 'गुण' णें म्हणतात.

**धर्म**—या शास्त्रांत गुण म्हणजे माणसांचे अंगीं असणारें हितकर सामर्थ्य. हें सामर्थ्य दोरीप्रमाणें माणसास वर अगर खालीं घालविण्यास समर्थ असतें. विज्ञान, रसायन, यंत्र व ज्योतिष या शास्त्रांत गुण म्हणजे विशिष्ट सवयी. या सवयी किंवा स्वभावामुळें विशिष्ट प्रकारचें कार्य वस्तूंच्या हातून घडतें. वैद्यकांत गुण म्हणजे आराम. औषधाचा गुण, द्रव्याचा गुण म्हणजे आराम उत्पन्न करण्याची शक्ति. शिल्प व समाजशास्त्रांत गुण म्हणजे विशिष्ट सामर्थ्य. जिनसांचे अंगीं व माणसें जनावरें वगैरेंचे अंगीं दुसऱ्याला आपल्याशीं बांधून घेण्याचें सामर्थ्य असतें ते त्यांचे गुण होत.

## पद.

**वदांत**—शास्त्रांत पद म्हणजे परमेश्वराचें स्थान. 'विष्णोर्यत्परमं पदं' निरनिराळ्या देवतांच्या स्थानांना पदेंच म्हणतात.

**योग**—शास्त्रांत मनाच्या किंवा साधकाच्या ज्या निरनिराळ्या भूमिका त्यांना पदें म्हणतात.

**भाषा**—शास्त्रांत पद म्हणजे शब्द. वस्तूचें नांव दाखविणारा जो अक्षरसमूह तो पद व ती वस्तु म्हणजे त्या पदाचा अर्थ किंवा पदार्थ. गणीतशास्त्रांत पद म्हणजे संख्या. निरनिराळ्या आंकड्यांची शब्दाप्रमाणें झालेली जी रकम ती पद होय. भाषेंत जशीं पदांचीं वाक्यें होतात त्याचप्रमाणें गणीतांतहि पदांचीं वाक्यें होतात व वाचकाला सगळी कल्पना समजावून देतात.

**धर्म**—शास्त्रांत पद म्हणजे देवतेचें राहण्याचें स्थान. प्रत्येक देवता कांहींतरी कल्पनेची मूर्त आकृति असतें. त्या कल्पनेची जेथें सीमा होते तेथें त्या देवतेचें पद समजावें.

**विज्ञान, रसायन, व यंत्र** हीं शास्त्रें प्रत्यक्ष जिनसांशीं म्हणजे पदार्थांशीं कामें करणारीं आहेत. तो पदार्थ ज्या कामीं उपयोगी पडतो तें त्याचें पद होय.

**ज्योतिः**—शास्त्रांत ग्रह वगैरेंचें स्थान म्हणजे पद होय.

**वैद्यक**—शास्त्रांत रोगाचें मूळ म्हणजे पद. चिकित्सेंत या 'निदानाचें' फार महत्त्व असतें. या मुळांतच रोगावर आघात करावा लागतो.

**शिल्प**—शास्त्रांत पद म्हणजे पाया. इमारतीचें मूळ या पायांत असतें. प्रारंभीं पाया म्हणजे खांबच फार खोल पुरलेले किंवा ठोकलेले असत म्हणून अशा खांबांना पद म्हणतात. इमारतींचा प्रारंभ पायापासून होतो.

**समाज**—शास्त्रांत पद म्हणजे विशिष्ट परिस्थितीचा प्रदेश. यासाठींच देशाला 'जनपद' म्हणतात. एका आचारविचारांच्या लोकांच्या रहाण्याचें ठिकाण म्हणजे जनपद होय.

# मंत्रद्रष्टे कीं मंत्रकर्ते ?

( लेखकः—केशव लक्ष्मण ओगले )

' यस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् । निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थमहेश्वरम् ' असें वेदभाष्यकार जे सायणाचार्य त्यांनीं आपल्या भाष्याच्या आरंभीं नमन केलें असून त्यांत वेद हे परमेश्वराचे निःश्वसित होत म्हणजे ते परमेश्वराच्या श्वासोच्छ्वासाबरोबर बाहेर आलेले होत असें दर्शविलें आहे. आतां वेदांतील जीं सूक्तें आहेत तीं कोणत्याना कोणत्या तरी ऋषीच्या नांवावर प्रसिद्ध आहेत. तेव्हां तीं सूक्तें त्या ऋषींनीं रचिलीं असें सकृद्दर्शनीं दिसून येतें. पण आपल्या धर्मशास्त्रकारांचें मत या विषयासंबंधानें असें आहे कीं वेदमंत्र हे ऋषींनीं केले नसून ते त्यांनीं तपोबळानें पाहिले व जगांत प्रसिद्ध केले. अशा दृष्टीनें ते ऋषींना वेदमंत्राचे कर्ते न म्हणतां द्रष्टे म्हणतात. **ऋषयो मंत्राणां द्रष्टारः न तु कर्तारः** असें त्यांचें हडसून खडसून म्हणणें आहे. ह्या विषयाची ही बाजू सुप्रसिद्ध व सर्वमान्य असल्यामुळें तिच्या विचारांत अधिक खोल जाण्याची आवश्यकता नाहीं. त्याच्या दुसऱ्या बाजूचाच थोडा विचार येथें करावयाचा आहे.

वैदिकमंत्रासंबंधानें बोलतांना ऋषि हा शब्द पारिभाषिक अर्थानेंहि योजिलेला असतो. **यस्य वाक्यं स ऋषिः** या न्यायानें एखाद्या संवादांत ज्याच्या तोंडीं जे शब्द घालावयाचे त्याला त्या शब्दांचा ऋषि असें म्हटलेलें असतें. उदाहरण, दहाव्या मंडलांतील ९५ वें सूक्त घेऊं. या सूक्तांत १८ ऋचा असून त्यांत पुरूरवा व उर्वशी यांचा संवाद आला आहे. यांतील पहिल्या मंत्रांत पुरूरवा ऊर्वशीशीं प्रेमकथा सांगण्यासाठीं तिला उभी रहावयास सांगत आहे. दुसऱ्या मंत्रांत उर्वशी त्याला झिडकारून परत जाण्यास सांगत आहे. अशा रीतीनें हा संवाद चालला असून जो मंत्र ज्याच्या तोंडीं असेल त्याचा तो किंवा ती ऋषि म्हणून सांगितलें आहे. दुसरें त्याच मंडलांतील १०८ हें सूक्त घेऊं. त्यांत देवांची कुत्री सरमा व देवांच्या गाई पळवून नेणारे पणि यांमधील संवाद वर्णिला आहे. पहिल्या मंत्रांत सरमेला पाहून पणि तिला इतक्या दूर कशाला आलीस असें विचारीत असून दुसऱ्यांत सरमा मी इंद्राची दूती आहे असें सांगत आहे. असा हा संवाद असून पणींनीं बोललेल्या वाक्यांचे ते ऋषि व सरमेनें बोललेल्या वाक्यांचा ऋषि सरमा असें म्हटलें आहे. बृहद्देवता नामक ऋग्वेदाच्या परिशिष्ट ग्रंथांत यासंबंधानें संवादेष्वाह वाक्यं यः स तु तस्मिन्भवेदृषिः । (२,८८) असें म्हटलें आहे. या ऋषि शब्दाच्या पारिभाषिक अर्थानें पहातां अग्नि, इंद्र, वरुण, सोम, प्रजापति इत्यादि देवताहि कित्येक ठिकाणीं ऋषि झालेल्या आहेत. उदाहरणार्थ, दहाव्या मंड-

त्याच्या ७१ व्या सूक्ताचा ऋषि बृहस्पति आहे, १३ व्या सूक्ताचा विवस्वान् आदित्य हा ऋषि आहे, १४ व्या सूक्ताचा यम ऋषि आहे, ४८ व्या सूक्ताचा ऋषि इंद्र आहे, १२९ व्या सुप्रसिद्ध नासदीय सूक्ताचा ऋषि प्रजापति परमेष्ठी आहे, १४० व्या सूक्ताचा अग्नि पावक ऋषि आहे, १४५ व्या सूक्ताचा ऋषि इंद्राणी आहे, इत्यादि.

परंतु या पारिभाषिक अर्थानें ऋषि शब्दाचा जो उपयोग केलेला आहे तो ऋषि मंत्रकर्ते कीं मंत्रद्रष्टे या प्रश्नांत महत्वाचा नाहीं. वेदांतील शब्दरचना कोणीं केली असा प्रश्न असतां, ती रचना कोणी देहधारी प्राण्यानें केली नसून ती अनादि आहे, ब्रह्मदेवानेंहि वेदांचें ध्यान करूनच सृष्टि निर्माण केली असें त्याचें उत्तर देण्यांत येतें. वेदांचें स्वयं सिद्ध प्रामाण्य ठरविण्यासाठीं असा पक्ष स्वीकारणें भाग पडलें, व त्याचें प्रतिबिंब भवभूतीच्या उत्तररामचरित्रांतील,

ब्रह्मर्षयो ब्रह्महिताय तप्त्वा परः सहस्रं शरदस्तपांसि।
एतान्यपश्यन्गुरवः पुराणाः स्वान्येव तेजांसि तपोमयानि ॥

या श्लोकांत दिसून येतें. ब्रह्मर्षींनीं हजारों वर्षें तपश्चर्या केली तेव्हां वेद हे त्यांना दिसले असें भवभूति म्हणतो व ऋषि हे मंत्रकर्ते नसून मंत्रद्रष्टे आहेत असें सांगतो. पण याच्या उलट वेदमंत्रांशीं ऋषींचा संबंध द्रष्टृत्वानें न लावतां कर्तृत्वानें लावणारा पक्ष अगदीं वेदकालापासून असून तो नास्तिक नसून पूर्ण आस्तिक आहे. स्वतः वेदांतहि 'हे इंद्रा, गोतमानें हें नवें सूक्त तुझ्यासाठीं केलें आहे' सनाय ते गोतम इंद्र नव्यमतक्षद्ब्रह्म हरियोजनाय। (ऋ० १, ६२, १३), इत्यादि सूक्तरचना ऋषींनीं केली असें सांगणारीं अनेक वचनें आहेत. 'एवा ते हरियोजना सुवृक्तीन्द्र ब्रह्माणि गोतमासो अक्रन्।' (हे इंद्रा, गोतमांनीं याप्रमाणें सुंदर शब्दरचना असलेलीं मनोहर सूक्तें रचिलीं आहेत) (ऋ, १, ६१, १६). 'हे अग्ने आम्ही गोतमकुलांतील पुरुष धनपति अशा तुझें सूक्तांनीं स्तवन करितों.' तं त्वा पतिमग्ने रयीणां प्रशंसामो मतिभिर्गोतमासः'। (ऋ० १, ६०, २६). इ०. पण याच्या पेक्षांहि स्पष्ट असा **मंत्रकृत्** हा शब्दहि स्वतः ऋग्वेदांत ऋषींसंबंधानें आलेला आहे. 'ऋषेः **मंत्रकृतां स्तोमैः** कश्यपोद्वर्धयन् गिरः।' (ऋ, ९, ११४, २) असा मंत्रकर्त्या ऋषींच्या स्तोत्रांचा उल्लेख केलेला दिसतो.

भागवत पुराणाच्या दशमस्कंधाच्या उत्तरार्धांत वेदस्तुति म्हणून जे श्लोक ८७ व्या अध्यायांत आढळतात त्यांत '**अत ऋषयो दधुस्त्वयि मनोवचनाचरितम्।** (१०, ८७, १५) असें ऋषींसंबंधानें स्वतः श्रुतींनीं म्हणजे वेदांनीं म्हटल्याचें दर्शविलें आहे. याचा अर्थ 'म्हणून वैदिक ऋषींनीं मनानें जें चिंतिलें व शब्दांनीं जें वर्णिलें तें तुझ्याकडेच लाविलें' म्हणजे वैदिक ऋषींचें सर्व वर्णन ब्रह्मपरच होय असा आहे. या ठिकाणीं वेदांचें तात्पर्य ब्रह्मपर आहे असें सांगण्याचा मुख्य हेतु आहे व त्यांत वेदशब्दाच्या स्थानीं ऋषि शब्द योजून वेदांचें व ऋषींचें तादात्म्य दर्शविलें आहे. असें

तादात्म्य ग्रंथ व त्याचा प्रणेता यांच्यांतच संभवतें. प्रस्तुत कालीं सुद्धां भगवान् म्हणतात असें म्हणावयाचें असल्यास गीता सांगते असा प्रयोगहि विकल्पानें करण्यांत येतो. या भागवतवाक्यावर श्रीधरानें टीका करतांना 'ऋषयो मंत्रास्तद्द्रष्टारो वा' असें म्हणून वेळ मारून नेली आहे. पण ऋषि हे केवळ मंत्रद्रष्टे म्हणजे मंत्रांचे प्रकाशक असतील तर त्यांचें व मंत्रांचें असें तादात्म्य जुळत नाहीं. वास्तव 'अत ऋषयो दधुस्त्वयि मनोवचनाचरितम्' हा चरण रचणारा ऋषींना मंत्रकर्ते असें मानणारा असावा अशी शंका येते. श्रीधरानें ऋषि म्हणजे मंत्रद्रष्टे असें म्हटलें तें त्याच्या वहिवाटीला धरूनच आहे. 'उमे संध्ये' म्हणजे तीन संध्या असा अर्थ श्रीधरानें केलेला आहे; कारण प्रचारांत कोणीं माध्याह्न संध्याहि सांगितली आहे. तसेंच श्रीकृष्णानें भौमासुराच्या बंदींतून सोडविलेल्या राजकन्यांची संख्या भागवतकारानें सोळा हजार अशी अनेक ठिकाणीं दिलेली असली तरी त्या प्रत्येक ठिकाणीं श्रीधर आपल्या टीकेंत **सोळाहजार** म्हणजे **सोळाहजार एकशें** असें समजावें असें म्हणतो. म्हणजे शब्दांतून कोणता अर्थ निघतो हें विशेषसें न पहातां पूर्वापार वहिवाटीला जुळेल असा अर्थ करण्याकडे त्याचें मुख्यत्वें लक्ष असतें.

पण हा भाग संशयित म्हणून सोडून दिला तरी शिष्टाचाराचें पूर्ण पालन करणारा कवि कुलगुरु कालिदास अनेक ठिकाणीं वैदिक ऋषींना मंत्रद्रष्टे न म्हणतां मंत्रकर्ते म्हणतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रघुवंशांत कालिदासानें वसिष्ठ, वरतन्तु व वाल्मीकि या ऋषींसंबंधानें उल्लेख करतांना त्यांना मंत्रकृत् असें विशेषण लाविलें आहे. यांपैकीं वसिष्ठ हा वैदिक ऋषि प्रसिद्ध आहे. पण वरतन्तु व वाल्मीकि यांचीं नांवें वैदिक ऋषींच्या नामावळींत आढळत नाहींत. पण तें कांहीं असलें, तरी त्यांना कालिदास अत्यंत थोर ऋषि समजून त्यांचा **मंत्रकृत्** शब्दांनीं गौरव करीत आहे एवढी गोष्ट खरी. वासिष्ठाचा संबंध आला तेथें कालिदासानें अत्यंत आदराचे शब्द घालून त्याला त्रिकालज्ञानी असें म्हटलें आहे.[1] असें असतांहि वसिष्ठाच्या कुशल प्रश्नाला उत्तर देतांना दिलीपाच्या तोडीं

> तव मंत्रकृतो मंत्रैर्दूरात्प्रशमितारिभिः ।
> प्रत्यादिश्यन्त इव मे दृष्टलक्ष्यभिदः शराः । रघु. १,६१

असे शब्द घातले आहेत. वसिष्ठ हा मंत्रांचा कर्ता असून त्याच्या मंत्रांनीं दिलीपाच्या शत्रूंचें परस्पर निर्दालन होत असल्यामुळें दिलीपाच्या बाणांचें कामच उरत नाहीं. या ठिकाणीं मल्लिनाथानें 'मंत्रकृतः मंत्राणां स्रष्टुः प्रयोक्तुः वा' असा वैकल्पिक अर्थ केला आहे. मंत्रकृत् म्हणजे मंत्र निर्माण करणारा किंवा त्यांचा उपयोग करणारा असें तो म्हणतो.

---

१. पुरुषस्य पदेष्वजन्मनः समतीतं च भवच्च भावि च । स हि निष्प्रतिघेन चक्षुषा त्रितयं ज्ञानमयेन पश्यति । रघुवंश ८, ७८.

अध्यग्रणीर्मंत्रकृतामृषीणां कुशाग्रबुद्धे कुशली गुरुस्ते । रघु. ५।४

असे शब्द कालिदासानें योजिले आहेत. 'वरतंतु हा मंत्र करणाऱ्या ऋषींचा नायक असून तो खुशाल आहे ना' असें रघुराजा त्या ऋषीच्या शिष्याला विचारीत आहे. या ठिकाणीं मात्र मल्लिनाथानें कांहीं आढेवेढे न घेतां 'मंत्रकृतां मंत्रस्रष्टॄणाम्' असा सरळ अर्थ दिला आहे. मंत्र करणारांमध्यें म्हणजे मंत्र उत्पन्न करणारांमध्यें असें तो या ठिकाणीं स्पष्ट सांगत आहे.

वाल्मीकीनें कुशलवांना सुसंस्कृत केलें असें सांगतांना कालिदास म्हणतो, '

सखा दशरथस्यापि जनकस्य च मंत्रकृत् ।
संचस्कारोभयप्रीत्या मैथिलेयौ यथाविधि । रघु १५, ३१

दशरथाचा व जनकाचा अशा दोघांचाहि प्रिय मित्र असा जो **मंत्रकर्ता** वाल्मीकि ऋषि त्यानें दोघांकडेहि लक्ष देऊन त्यांच्या नातवांना सुसंस्कृत केलें. या ठिकाणीं मात्र मल्लिनाथानें परंपरेला बळी पडून 'मंत्रकृत् मंत्रद्रष्टा' असा अर्थ दिला आहे.

कालिदासाच्या मनांत मंत्रद्रष्टा असेंच या प्रत्येक ऋषीसंबंधानें म्हणावयाचें असतें तर मंत्रकृतः, मंत्रकृताम्, व मंत्रकृत् या शब्दांच्या स्थानीं मंत्रदशः, मंत्रदशाम् व मंत्रदृक् असे शब्द छंदःशास्त्राचा मुळींच बिघाड न होतां त्याला योजतां आले नसते काय? मग त्यानें प्रत्येक ठिकाणीं मंत्रकृत् असेंच कां म्हटलें? तो ऋषींना मंत्रकारच समजत होता म्हणून.

---

# कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे
## आणि
# श्रीसमर्थरामदासस्वामींचा सांप्रदाय

( लेखकः— भास्कर वामन भट )

उत्तम गुणीं शृंगारला। ज्ञान वैराग्यें शोभला।
तोचि येक जाणावा भला। भूमंडळीं॥ दा. बो. १२-१०-१७

श्रीसमर्थरामदासांच्या ह्यातींत त्यांच्या शिष्यवर्गांत धगधगीत वैराग्यसंपन्न आणि स्वार्थत्यागी शिष्य अनेक होते असें सांप्रदायाच्या इतिहासाचा ज्यांना परिचय झाला आहे त्यांना सांगण्याची जरूरी नाहीं. त्या काळीं होऊन गेलेल्या अशा प्रकारच्या समर्थसांप्रदायिकाच्या तोडीचा आधुनिक काळीं महाराष्ट्रांत कोणी झाला आहे काय? असा कोणीं प्रश्न केल्यास त्या प्रश्नाचें सर्वतोमुखीं जें एकच उत्तर दिलें जाईल तें हेंच कीं, समर्थांच्या काळच्या उज्ज्वल व श्रेष्ठ सांप्रदायिकांच्या कोटींत गणना करण्यास पूर्ण लायक अशी आधुनिक काळांतील व्यक्ति म्हटली म्हणजे कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ही होय. राजवाड्यांचा व ज्यांचा उत्तम परिचय होता त्यांना हें विधान सहजच पटण्यासारखें आहे. राजवाड्यांचा स्वार्थत्याग पराकाष्ठेचा होता. निरलसता, सतत व्यासंग, सरस्वतीची आराधना ह्या बाबतींत त्यांची बरोबरी कोणीच करूं शकला नाहीं. द्रव्यलोभाचा पूर्ण अभाव ज्यांनीं आपल्या वृत्तींत बाणला होता अशी राजवाड्यांखेरीज दुसरी व्यक्ति महाराष्ट्रांत सांपडणें विरळा आहे. श्रीसमर्थरामदासस्वामी यांनीं ज्या उच्च तत्वांचा उपदेश केला तीं तत्वें राजवाड्यांनीं प्रत्यक्ष आचरून दाखविलीं व आधुनिक महाराष्ट्राच्या पतित काळांत हि खरे रामदासी बाण्याचे लोक महाराष्ट्रांत निपजूं शकतात असें त्यांनीं जगाच्या निदर्शनास आणून दिलें. समर्थांच्या शिकवणींपैकीं राजवाड्यांनीं कोणतीं तत्वें आचरून दाखविलीं याची प्रस्तुत स्थलीं जरा विस्तृत चर्चा करणें जरूर आहे. दासबोध ग्रंथांत समर्थांची सर्व शिकवण आपणांस आढळते. तरी त्या ग्रंथांत समर्थांनीं उपदेशिलेल्या कांहीं तत्वांचा उल्लेख करून तीं तत्वें राजवाड्यांनीं आपल्या आचरणांत कितपत आणिलीं होतीं याचें आम्ही दिग्दर्शन करितों. समर्थ गोदातटाक सोडून कृष्णातटाकीं राहावयास आल्यानंतर समर्थ, लोकांना खालील ओंव्यांत उल्लेखिल्याप्रमाणें भासत;—

जनास दिसे हा दुश्चित। परी तो आहे सावचित।
अखंड जयाचें चित्त। परमेश्वरीं॥ १४-७-१५





अनुक्रमणिका

राजवाड्यांनीं स्वतःस इतिहाससंशोधनाच्या कार्यास वाहून घेतल्यापासून तो थेट त्यांच्या निधनापर्यंत त्यांची वृत्ति वरील ओंव्यांत वर्णिल्याप्रमाणें होती. राजवाड्यांच्या नित्य चरित्रक्रमाचें वर वर अवलोकन करणारास ते दुश्चित भासत; परंतु त्यांच्याशीं परिचय असलेल्या मंडळीस ते कधींच दुश्चित असल्याचें आढळलें नाहीं. उलट आपल्या या महाराष्ट्र देशाचें व महाराष्ट्रीय लोकांचें पुढें काय होईल याविषयीं चिंता ते अहर्निश वाहात असल्याचें आढळून येई. आपल्या देशबांधवांचें कल्याण कोणत्या मार्गानें होईल, याबद्दलचे विचार त्यांच्या मनांत सतत घोळत असत. महाराष्ट्रीय जनता-जनार्दनरूपी परमेश्वराचें चिंतन त्यांचें सतत चालू असें.

समर्थांनीं महंताचीं कित्येक लक्षणें दासबोधांत दिलीं आहेत; त्यांपैकीं खालील ओंव्यांत ग्रथित केलेलीं तत्त्वें राजवाड्यांच्या आचरणांत दृष्टोत्पत्तीस येत:—

वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण ।
चाळणेविण येक क्षण । जाऊं च नेदी ॥७॥
त्यागी वोळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ।
लोक शोधून पाहाती मन । परी इच्छा दिसेना ॥८॥
पुतें कोणाकडे पाहेना । पुतें कोणासीं बोलेना ।
पुतें येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥९॥
जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ।
आपुली स्थिती अनुमाना । येवों च नेदी ॥१०॥
लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ।
लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनी ॥११॥
लोकांस पाहाव्या आदर । तेथें याचा अनादर ।
लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिछ्या ॥१२॥
एवं कल्पितां कल्पेना । ना तर्कितांहि तर्केना ।
कदापी भावितां भावेना । योगेश्वर ॥१३॥
ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना ।
क्षणयेक विश्रांभेना । कथा कीर्तन ॥१४॥
लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघेचि निर्फळ होती ।
जनाची जना लाजवी वृत्ति । तेव्हां योगेश्वर ॥१५॥ दा. बो. द. ११-१०

समर्थांच्या या ओंव्यांत योगेश्वराचीं जीं लक्षणें दिलीं आहेत, तीं राजवाड्यांच्या चरित्रास पूर्णपणें लागू पडतात. त्यांचा वेष अत्यंत साधा असे. तो इतका साधा असे कीं, त्यांच्यावर या साध्या पोषाकामुळें कित्येक वेळां विचित्र प्रसंग येत. धुळ्यास गांवाबाहेर ते ज्या बंगल्यांत राहात असत, त्या बंगल्यापासून थोड्या अंतरावर एका बंगल्यांत दुसरे एक गृहस्थ राहात असत. या गृहस्थाच्या स्वयंपाक्यानें राजवाड्यांना त्या बाजूस हिंडतांना कित्येक वेळां पाहिलें होतें. त्यांचा तो साधा पोषाख पाहून राजवाडे हे आपल्याच वर्गापैकीं एक आहेत असें वाटून तो स्वयंपाकी एकदां

बंगल्यांत त्यांच्याकडे गप्पागोष्टी करावयास गेला. चिलीमविडी ओढणारा एक स्वजातीय आपणास लाभेल, अशी या स्वयंपाक्याची अर्थात् अपेक्षा होती. परंतु बंगल्यांत गेल्यानंतर बोलणेंचालणें सुरू झाल्यावर थोड्याच वेळांत त्याच्या भ्रमाचा निरास होऊन त्यानें बंगल्यांतून जो पाय काढला, तो त्यानें फिरून बंगल्याचें दर्शन घेतलें नाहीं. या प्रसंगानंतर त्यांची गांठ पडली असतां साध्या पोषाकांत राहाण्यामुळें हलक्या लोकांकडून होणारा अपमान कसा सहन करावा लागतो व हलके लोक सलगी करण्याचा कसा प्रयत्न करतात, हें त्यांनीं मला सांगितलें. असो. अशा प्रकारची राजवाड्यांची बाह्य चर्या होती; परंतु अंतःकरणांत महत्कार्य करून कीर्तीचें भूषण संपादन करण्यांतच ते धन्यता मानीत. धुळें शहरांत राजवाड्यांचें वास्तव्य बरेच दिवस असून हि, या शहरांतील लोकांच्या मुद्दाम ओळखी करून घेण्याची अपेक्षा त्यांनीं कधीं हि बाळगिली नाहीं. तशी अपेक्षा त्यांनीं बाळगिली असती तर ती गोष्ट त्यांना सहज च साध्य झाली असती. परंतु त्यांची वृत्ति अखंड त्यांच्या व्यवसायांत गुंतली असल्याकारणानें ओळखी करून घेण्याच्या भानगडींत ते कधीं च पडले नाहींत. उलट कोणाची ओळख होण्याचा प्रसंग आल्यास तो ते मुद्दाम टाळीत. एका जागीं दोन, तीन महिन्यांपेक्षां अधिक दिवस राजवाडे राहिले असें सहसा होत नसे. नित्य नूतन प्रदेशांत प्रवास करून नवीं स्थळें पाहावयाचीं, ज्या कार्यास वाहून घेतलें तें कार्य ज्या लोकांकडून होण्याचा संभव असेल, त्यांच्याविषयीं किंचित् माया दाखवून त्यांच्याशीं परिचय करावयाचा असें त्यांच्या वर्तनाचें धोरण असे. "पुर्ते कोणाकडे पाहेना" इत्यादि ओंव्यांत महंताची जी वृत्ति वर्णिली आहे, ती त्यांच्यामध्यें पूर्ण बाणली होती. राजवाड्यांनीं ही वृत्ति कृत्रिमपणें स्वीकारली होती अशांतला भाग नव्हता. संशोधनकार्य, विद्याव्यासंग यांत राजवाडे इतके गर्क झालेले असत कीं, रिकामटेकडया लोकांशीं बोलून फुकट घालवायला त्यांच्याजवळ मुळीं च वेळ नव्हता. यामुळें त्यांची भेट घ्यावयास कोणी आल्यास त्यांचें त्या माणसाशीं तुसडेपणाचें वर्तन होत असे.

कोणत्या हि गांवीं राजवाडयांचें वास्तव्य दोन तीन महिने झालें म्हणजे तो गांव सोडून दुसऱ्या कोणत्या तरी गांवीं ते जात. " एके ठिकाणीं फार दिवस राहून कंटाळा आला, आतां थोडें फिरून येतों " असें ते म्हणत. या प्रमाणें हलण्याचा एकदां निश्चय झाल्यावर प्रयाणाचा दिवस ते निश्चित करीत. बहुशः निश्चित केलेल्या दिवशीं ते प्रयाणास न निघतां दुसऱ्या कोणत्या तरी दिवशीं प्रयाणास निघावयाचें असें नेहमीं आढळण्यांत येत असे. एका गांवाहून दुसऱ्या गांवीं त्यांचा जाण्याचा उद्देश, नवीन ग्रंथांचें अगर ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन करणें हा असे. नागपुरास जावयाचा बेत ठरवून स्टेशनवर गेल्यावर नागपुरचें तिकीट न काढतां पुण्याचेंच तिकीट त्यांनीं काढावें असें कित्येकदां अनुभवास येत असे. संशोधनार्थ सफरीस निघण्यापूर्वीं कोणत्या प्रांतांत जावयाचें याविषयीं त्यांच्याशीं वाटाघाट होत असे. या

वाटाघाटींत कोणत्या प्रांतांत मी सफरीस जात आहें, याचा बभ्रा करूं नका, असें ते वजावून सांगत; व मी कोणीकडे, कोठें जात आहें अशाविषयीं कोणी तपास केल्यास, दक्षिण दिशेकडे जाण्याचा वेत ठरला असला तर उत्तर दिशेकडे गेलों, असें सांगा असें ते मुद्दाम वजावून सांगत. राजवाडयांची वृत्ति अत्यंत संशयी असून आपल्या हालचालीचा सुगावा दुसऱ्यास लागूं नये, अशी खबरदारी ते नेहमीं घेत. कारण आपण योजिलेल्या कार्याचा बिघाड, आपल्या हालचालीचा सुगावा दुसऱ्यास लागल्यास होईल अशी त्यांना भीति वाटत असे.

प्रस्तुतच्या सुशिक्षित लोकांचीं करमणुकीचीं साधनें म्हणजे पत्ते, बुद्धिबळें हे खेळ, हीं होत. त्या च प्रमाणें संगीत नाटकें, सिनेमा इत्यादि करमणुकीचीं साधनें हि बहुतेकांस मान्य अशा प्रकारचीं आहेत. राजवाड्यांना या सर्व करमणुकीच्या साधनां-विषयीं व त्यांत वेळ घालविणाऱ्या लोकांविषयीं अत्यंत तिटकारा वाटत असे. इतकेंच नव्हे, तर अलीकडील शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांना संगीत नाटकांतील एखाद्या पदाचा भाग गुणगुणण्याची जी संवय आढळते, ती पाहून त्यांना अत्यंत संताप येत असे. सुशिक्षित विद्यार्थ्यांच्या या संवयीप्रमाणें गांवढळ तरुणांना एखाद्या लावणीचे चरण रस्त्यानें जातां जातां मोठ्या आवाजांत म्हणण्याची संवय दृष्टोत्पत्तीस येते. या संवयीचा हि त्यांना अत्यंत तिटकारा वाटत असे. धुळें येथें ते ज्या बंगल्यांत राहात असत, त्याच्या आसपास गुरें राखणारीं गवळ्याचीं पोरें शेतांतून गाईम्हशी चारतांना मोठ्या आवाजांत लावण्या म्हणतांना त्यांना आढळत. अशा रीतीनें त्यांच्या कानांवर आवाज गेले म्हणजे त्यांना अत्यंत संताप येत असे. हा संताप येण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या एकाग्रतेचा भंग या आवाजामुळें होत असे हें होय.

आतां पावेतों वर्णन केलेल्या राजवाड्यांच्या विशिष्ट प्रकारच्या स्वभावामुळें सामान्य लोकांस राजवाडे ही एक गूढ व विचित्र व्यक्ति आहे असें भासे. परंतु खरा प्रकार

> **" ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना ।**
> **क्षण येक विशंभेना । कथाकीर्तन ॥ " दा. बो. ११-१०-१४**

इत्यादि ओंव्यांत वर्णिल्या प्रमाणें त्यांची वृत्ति होती.

> **" अखंड येकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा ।**
> **काळ सार्थक चि करावा ॥ " दा. बो. ११-१०-१७**

असा समर्थांनीं जो उपदेश केला आहे, तो राजवाडयांनीं आपल्या आयुष्याच्या ३५ वर्षें मूर्तिमंत आचरून दाखविला. यावरून समर्थसांप्रदायी या दृष्टीनें राजवा-डयांचा अधिकार केवढा मोठा होता हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्यांनीं आपल्या आयुष्यामध्यें जें ध्येय आपल्यापुढें ठेविलें होतें तें साध्य करण्याच्या दृष्टीनें समर्थांनीं खालील ओंव्यांत वर्णन केलेली शिकवण अमलांत आणल्याचें आढळून येतें.



अनुक्रमणिका

लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ।
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ दा. बो. ११-१०-२१

नागपूरपासून सांगली, मिरज यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत आपल्या कार्याविषयीं सहानुभूति बाळगणारे लोक शोधून काढून राजवाडे त्यांच्याशीं स्नेहभावानें वागले, व त्यांनीं त्यांच्या मार्फत महाराष्ट्रांत इतिहाससंशोधनाची प्रगति पुष्कळ च केली, असें निरनिराळ्या शहरांत त्यांचे जे चाहाते सद्गृहस्थ आढळतात त्यावरून स्पष्ट होतें.

लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ।
लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनि ॥ दा. बो. ११-१०-११

असें एक महंतलक्षण समर्थांनीं वर्णिलें आहे. यांत वर्णिल्याप्रमाणें राजवाडयांचें वर्तन कित्येक वेळां होत असल्याचें त्यांच्या चहात्यांच्या प्रत्ययास येत असे. राजवाडयांच्या निधनापूर्वी २।३ वर्षे शारदोपासकमंडळानें मराठी भाषेविषयीं एक प्रबंध वाचावा अशी त्यांना विनंति केली. राजवाडे हे मराठी भाषेचे मोठे अभिमानी आहेत; त्याचप्रमाणें त्या भाषेची ते एकनिष्ठपणें सेवा करीत आहेत, असें पाहून त्यांच्या प्रबंधांत मराठी भाषेचें भवितव्य उठावदार रीतीनें वर्णिलेलें आढळेल अशी पुष्कळांची अपेक्षा होती. परंतु राजवाड्यांनीं प्रबंध वाचिल्यानंतर पुष्कळांची निराशा होऊन कित्येक लोक त्यांच्यावर संतापले. भावी कालांतील आपली भाषा, आपला देश व आपला समाज यांच्या प्रगतीविषयीं व भरभराटीविषयीं आशावादीपणा बाळगावा अशी सामान्य जनांची प्रवृत्ति असते; परंतु त्यांच्या भाषणांत त्यांनीं मराठी भाषेचें भवितव्य निराशा उत्पन्न करणारें दर्शविल्यामुळें त्यांच्या प्रबंधांतील विचारसरणी लोकांस पसंत पडली नाहीं, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु राजवाडयांसारख्या ज्ञात्या व निस्पृही गृहस्थास लोकांना अशा रीतीनें खूष करण्याची कल्पना पसंत पडणें कधींच शक्य नव्हतें. राजवाडयांनीं आपल्या प्रबंधांत मराठी भाषेचें जें भेसूर भवितव्य रेखाटलें आहे, तें वाचून कोणाहि महाराष्ट्रियाच्या अंतःकरणांत उद्वेग व दुःख या भावना उत्पन्न झाल्याविना राहाणार नाहींत ही गोष्ट खरी. पण महाराष्ट्राच्या कल्याणाच्या दृष्टीनें कटु पण सत्य गोष्ट महाराष्ट्रियांच्या निदर्शनास आणून मराठी भाषेच्या अभ्युदयाचा खरा मार्ग कोणता हें त्यांना समजावून देणाऱ्या राजवाडयांसारख्या निस्पृही सत्यवक्त्याची जरूरी आहे, हें कोणास हि कबूल करावें लागेल.

बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें । दा. बो. १२-१-०३९

त्या च प्रमाणें

वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥ दा. बो. १२-१०-३
क्रियेविण शब्दज्ञान । तें चि स्वानाचें वमन ।
भले तेथें अवलोकन । कदापी न करिती ॥ दा. बो. १२-७-३०
जैसें मुखें ज्ञान बोले । तैसी च सर्वे क्रिया चाले ॥ दा. बो. १२-४-१३

इत्यादि वचनांत समर्थांनीं जीं तत्वें उपदेशिलीं आहेत, तीं राजवाडयांनीं स्वतःच्या आचरणांत पूर्णपणें आणिलीं होतीं. आधीं स्वतः क्रिया करून दाखवावयाची मग बोलावयाचें असा राजवाडयांच्या वर्तनाचा नियम होता. यामुळें ज्या ज्या लोकांशीं त्यांचा संबंध येत असे, त्यांच्या मनांत त्यांजविषयीं पराकाष्ठेचा आदर उत्पन्न झाल्या शिवाय राहात नसे. राजवाडयांच्या अशा वर्तनामुळें स्वाभाविकपणें च त्यांना महंतपण प्राप्त झाला. समर्थांनी

**" म्हणोन आळस सोडावा । येत्न साक्षेपें जोडावा ।**
**दुश्चितपणाचा मोडावा । थारा वळें ॥ " दा. बो. १२-९-८**

या ओंव्यांत आळस सोडून यत्न करण्याविषयीं उपदेश केला आहे. या उपदेशाप्रमाणें राजवाडयांनीं आपल्या आयुष्याची अखंड पस्तीस वर्षें घालविलीं. आळस हा पदार्थ राजवाडयांना माहित नव्हता; ते सतत उद्योगांत गढलेले असत. पुढें ठेविलेल्या ध्येयाच्या सिध्यर्थ त्यांचे अविश्रांत परिश्रम चाललेले असत. इतिहासमंडळयांची स्थापना ठिकठिकाणीं करण्याचे त्यांनीं जे प्रयत्न केले, तें हे सतत यत्न करण्याविषयींची जी रामदासी शिकवण त्यांच्या आंगीं बाणली होती तिचें च फळ होय.

**जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।**
**जो आपण चि कष्टत गेला । तो चि भला ॥**

या ओंव्यांत ग्रथित केलेल्या उपदेशानुसार राजवाडे नेहमीं वागत असत. कोणतें हि काम त्यांना करणें असेल तर ते दुसऱ्यावर सहसा विसंबत नसत. दुसऱ्यावर काम सोंपविल्यास तें काम चांगल्या रीतीनें केलें जाईल किंवा नाहीं याविषयीं त्यांना भरंवसा वाटत नसे व म्हणून च होतां होई तों मनांत आणलेलें कार्य स्वतः च करावयाचें असा त्यांचा दंडक होता.

**" दिल्या द्रव्य घेऊं नये । " दा. बो. १४-१**

या समर्थोक्तींत नमूद केल्याप्रमाणें राजवाडयांचें वर्तन असे. त्यांची वृत्ति उदास व निस्पृह असे. या त्यांच्या स्वभाववैशिष्ठ्यामुळें

**उत्कट भव्य तें चि घ्यावें । मळमळित अवघेंचि टाकावें ।**
**निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १९-६-१५**

या ओंव्यांत वर्णिल्याप्रमाणें महाराष्ट्रांत ते विख्यात झाले.

**कांहीं येक उत्कटे वीण । कीर्ति कदापि नव्हे जाण ।**
**उगेंच वणवण हिंडोन । कायें होतें ॥ दा. बो. १९-६-२४**

या समर्थवचनांत नमूद केल्याप्रमाणें राजवाडयांनीं अंगीकृत कार्याविषयीं पराकाष्ठेची उत्कटता बाळगिली, व श्रेष्ठ प्रकारची कीर्ति संपादन केली.

कीर्ति करूनि नाहीं मेले। ते उगेच आले आणि गेले।
शाहाणे होऊन भुलले। काय सांगावें ॥ १२-८-२७

या समर्थोक्तींत सांगितलेल्या कोटींत न पडतां राजवाडे कीर्ति करून मेले.

समर्थांनीं उपदेशिल्याप्रमाणें राजवाडयांचें आचरण कसें होतें, या मुद्याचें येथपावेतों स्पष्टीकरण केलें. परंतु प्रस्तुत स्थळीं ही गोष्ट येथें नमूद करून ठेवणें जरूर आहे कीं, लोकसंग्रहाच्या दृष्टीनें महंतांनीं आचरावयाच्या तत्त्वांपैकीं कांहीं तत्त्वें राजवाडयांनीं आपल्या आचरणांत आणिलीं नाहींत; व यामुळें च त्यांच्या आयुष्यांत समर्थ ही पदवी व विसाव्या शतकांतील रामदासांचा नवावतार असें म्हणून घेण्याचा मान त्यांना लाभला नाहीं. लोकसंग्रहदृष्ट्या समर्थांनीं उपदेशिलेलीं खालील तत्त्वें महत्त्वाचीं असून लोकसंग्रहाची हाव बाळगणाऱ्या प्रत्येक राष्ट्रधुरीणानें तीं आपल्या आचरणांत आणणें अत्यवश्य असतें.

नाना जनाचें हृदये। मृदशब्दें उकलावें ॥ दा. बो. १९-२-१०
उंचनीच म्हणों नये। सकळांचें निववावें हृदय ॥ दा. बो. १९-२-१८
अंतरास लागेल ढका। ऐसी वर्तणूक करूं नका ॥
लोक राजी राखोन कीजे। सकळ कांहीं ॥
या कारणें मनोगत। राखेल तो मोठा महंत ॥
मनोगत राखतां समस्त। वोढोन येती ॥ १३-१०-२९
दुर्जन प्राणी समजावे। परी ते प्रगट न करावे।
सज्जना परीस आळवावे। महत्त्व देउनी ॥ १९-९-२३

वरील समर्थवचनांत सांगितलेल्या तत्त्वांच्या अगदीं विरुद्ध राजवाडयांचें वर्तन असे. राजवाडयांची वृत्ति अत्यंत कठोर, त्या च प्रमाणें त्यांची जिह्वाहि अत्यंत कठोर होती. यामुळें त्यांच्याजवळ येणारीं माणसें थोडया च वेळांत त्यांजपासून दूर पळून जात; व फिरून त्यांच्या सन्निध जावयास धजत नसत. परांतरास ढका न लावितां, सर्वत्रांचे दोष जाणून आपल्या कार्यास माणसांचा उपयोग कसा करून घ्यावयाचा ही कला लोकमान्यांच्या ठिकाणीं जशी होती, तशी ती राजवाड्यांच्या ठिकाणीं नव्हती; या कलेचा राजवाडयांच्या ठिकाणीं पूर्ण अभाव होता; यामुळें राजवाडे लोकसंग्रह करूं शकले नाहींत. लोकोपयोगी संस्था निर्माण करून त्या चालविण्याचें त्यांनीं जें थोडें फार श्रेय संपादन केलें, तें केवळ त्यांच्याठायीं असलेल्या लोकोत्तर गुणांमुळें च होय. राजवाडयांच्या ठिकाणीं असलेले लोकोत्तर गुण लक्षांत घेऊन त्यांच्या कार्याचा पुरस्कार करावयाचा या भावनेनें त्यांस सामील झालेल्या लोकांनीं राजवाडयांनीं निर्माण केलेल्या संस्था चालविण्यासाठीं त्यांच्याशीं सहकार्य केलें व यामुळें संस्था स्थापन करण्याचें थोडें फार श्रेय त्यांच्या वाटयास आलें. शरदृतूंतील दूर अंतरावरून रम्य भासणाऱ्या पर्वतासारखे राजवाडे हे होते. दुरून पाहून मनांत आदर उत्पन्न व्हावयाचा. परंतु जवळ जावयाची सोय नाहीं अशा प्रकारची राजवाडे ही व्यक्ती होती. मानवी प्राणी सर्वगुणसंपन्न असा सांपडणें कठीण. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां, राजवाडयांच्या ठिकाणीं वरील गुणांचा

अभाव होता यांत कांहीं नवल नाहीं. परंतु त्यांच्याठायीं ह्या गुणांचें अस्तित्व नसल्यानें आपल्या राष्ट्राचें नुकसान झालें यांत मात्र संशय नाहीं. लोकसंग्रहदृष्ट्या जे गुण अवश्य असल्याचें समर्थांनीं सांगितलें, ते गुण जर राजवाडयांच्या ठिकाणीं असते, तर हल्लीं राजवाडयांच्या पश्चात् त्यांनीं केलेलें कार्य ज्या स्वरूपांत दिसत आहे, त्यापेक्षां तें शतपटींनें अधिक प्रमाणांत अस्तित्वांत असल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीस आलें असतें. राजवाडयांच्या स्वभावाचा ज्यांना विशेष परिचय आहे त्यांना, राजवाडयांनीं आपल्या हयातींत ज्या प्रमाणांत कार्य साध्य केलें, त्या प्रमाणांत त्यांना तें कसें साध्य करितां आलें याचें च आश्चर्य वाटतें. " मी आतां एकांतवास सोडून देऊन प्रचलित राजकारणांत भाग घ्यावयाचें ठरविलें आहें" असे उद्गार संभाषणप्रसंगीं ते कित्येकदां काढीत. अशा प्रकारचे उद्गार त्यांनीं काढिले म्हणजे " आपला स्वभाव लक्षांत घेतां ही गोष्ट आपणांस कितपत साधेल याची शंका आहे " असें आम्ही त्यांना म्हणत असूं. यावर "एकदां अमुक गोष्ट करावयाची हें निश्चितपणें ठरलें म्हणजे मी माझ्या स्वभावांत बदल करीन" असें ते म्हणत. परंतु हें त्यांचें म्हणणें आम्हांस पटत नसे. 'स्वभावो दुरतिक्रमः' यांत मानवी प्राण्याच्या स्वभावाविषयीं जें तत्त्व ग्रथित केलें गेलें आहे, तें खोटें ठरणें दुरापास्त आहे. असो. ही बाव सोडून दिली तरी समर्थसांप्रदायाच्या उन्नतीच्या काळांत त्या सांप्रदायाच्या संस्थापकाच्या प्रमुख अनुयायांच्या ठिकाणीं आढळणारे अनेक गुण राजवाडयांच्या ठिकाणीं होते, ही गोष्ट निर्विवाद आहे.

महाराष्ट्राच्या प्रस्तुतच्या अवनत स्थितींत हि राजवाडयांसारखीं खऱ्या रामदासी बाण्याचीं माणसें निपजूं शकतात असें राजवाडयांनीं आपल्या चरित्रावरून सिद्ध केलें आहे. व या सांप्रदायाचें पुनरुज्जीवन करणें दुरापास्त नाहीं, हें महाराष्ट्रियांच्या निदर्शनास आणून दिलें आहे. राजवाडयांनीं, रामदासी सांप्रदायाच्या प्रस्तुतच्या अवनत काळांत सांप्रदायाची ही एक प्रकारें बहुमोल सेवा च केली आहे, व या दृष्टीनें रामदासी सांप्रदायिकांस त्यांचें चरित्र विशेष आदरणीय वाटलें पाहिजे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

राजवाडयांनीं स्वतःच्या आचरणानें रामदासी सांप्रदायाची ज्याप्रमाणें एक प्रकारें सेवा केली, त्याच प्रमाणें त्यांनीं आपल्या लेखणीनें व बुद्धीनें समर्थसांप्रदायाची अमूल्य सेवा केली आहे ही गोष्ट समर्थसांप्रदायिकांच्या नजरेस आणणें जरूर आहे. ऐतिहासिक संशोधनाच्या निरनिराळ्या शाखांचें बीजारोपण करण्याचा मान ज्याप्रमाणें राजवाडयांनीं संपादन केला त्याच प्रमाणें रामदासी सांप्रदायाच्या वाङ्मयाच्या संशोधनाच्या कार्यास हि हात घालण्याचा प्रथम मान राजवाडयांनींच पटकावला. गतकालीं महाराष्ट्रांत ज्या अनेक ऐतिहासिक थोर विभूति होऊन गेल्या त्यांपैकीं ज्या दोन विभूतींविषयीं राजवाडयांच्या ठिकाणीं अत्यंत आदर वसत असे अशा विभूति म्हटल्या म्हणजे श्रीसमर्थरामदासस्वामी व श्रीछत्रपतिशिवाजीमहाराज या होत. या दोन विभूतींविषयीं अनादर व्यक्त करणारे उद्गार राजवाडयांच्या तोंडांतून कधीं हि निघत नसत.

या दोन्ही विभूतींच्या उज्जल चरित्रांशीं महाराष्ट्रीयांचा परिचय करून देण्याचें महत्कार्य राजवाडयांनीं व्याख्यान व लेखन यांच्या द्वारां केलें आहे. या विषयींची थोडी-बहुत कल्पना सांप्रदायिकांस प्रस्तुत स्थळीं करून देणें जरूर आहे.

अगदीं प्रथम कै. आण्णा विजापूरकर यांच्या ग्रंथमाला मासिक पुस्तकांत श्री समर्थरामदासस्वामींविषयीं रामदास या मथळ्याखालीं एक विस्तृत व चर्चात्मक लेख राजवाडयांनीं प्रसिद्ध केला. हा लेख लिहिण्यापूर्वींपासूनच सांप्रदायाच्या वाङ्मयाचें संशोधनकार्य राजवाडयांनीं हातीं घेतलें होतें. समर्थांच्या दासबोधाची एक जुनी प्रत व समर्थांचे शिष्य गिरधर यांचे बरेच ग्रंथ त्यांनीं गोळा केले होते. याप्रमाणें ही सामग्री गोळा केल्यानंतर रामदास आणि रामदासी मासिकाचे समर्थप्रेमी संपादक रा. शंकर श्रीकृष्ण देव व राजवाडे यांची गांठ पडली. समर्थसांप्रदायाच्या संशोधनाचें कार्य एकनिष्ठपणें व उत्कृष्ट रीतीनें पार पाडण्यास लायक गृहस्थ लाभल्याचें पाहून राजवाडयांनीं समर्थसांप्रदायाची गोळा केलेली अमूल्य ग्रंथ–संपत्ति त्यांच्या हवालीं केली. संशोधकाच्या स्वभावाची ज्यांना माहिती आहे त्यांना राजवाडयांची ही कृति जगांतील नऊ अजब चिजांपैकीं ही एक चीज आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. संशोधक म्हटला म्हणजे त्याच्या संग्रहीं असलेलें जुनें चिटोरें दुसऱ्यास देतांना त्याला प्राण जाण्याच्या प्रसंगीं होणाऱ्या वेदनांच्या पलीकडील वेदना होतात. हा संशोधकाचा स्वभाव ज्या लोकांना माहीत आहे त्यांना राजवाडयांविषयीं जें वरील विधान आम्हीं केलें आहे त्याची पूर्ण सत्यता पटल्यावांचून राहणार नाहीं. आपलें कार्य करण्यास योग्य व लायक मनुष्य भेटतांच तें कार्य स्वतःच करण्याचा लोभ न बाळगतां तें लायक माणसाच्या हातून पार पाडण्याच्या बाबतींत त्यास प्रोत्साहन द्यावयाचें असा राजवाडयांचा थोर व उदार स्वभाव होता. समर्थांच्या दासबोधाच्या स्वरूपाचा परिचय महाराष्ट्रास राजवाडयांनीं करून दिल्यानंतर कांहीं वर्षांनीं समर्थांची व शिवाजीमहाराजांची छत्रपतींच्या आयुष्याच्या उत्तर भागांत भेट झाली व तोंपावेतों परस्परांच्या हालचालींची परस्परांस वार्ता नव्हती असा एक नूतन वाद महाराष्ट्रांत सुरू झाला. हा वाद सुरू झाल्यानंतर राजवाडयांचें लक्ष समर्थ–चरित्राकडे फिरून वेधलें गेलें व समर्थचरित्राचें संशोधन करण्याकरितां त्यांनीं चाफळ गांवाकडे सफर केली. चाफळ एथें गेल्यानंतर कांहीं दिवस राजवाडयांनीं तेथें वास करून समर्थांच्या चरित्रांतील वरील वादविषयक प्रश्न सोडविण्यास उपयुक्त असे कांहीं लेख चाफळ येथील कांहीं पुरातन घराण्यांचीं दप्तरें तपासून शोधून काढिले व त्यांच्या आधारें शिवाजीमहाराजांस समर्थांचा अनुग्रह कोणत्या सालांत झाला या संबंधाची चर्चा करून अनुग्रहाचें साल त्यांनीं निश्चित ठरविलें व "श्रीसमर्थांनीं श्रीशिवछत्रपतीस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ" या मथळ्याखालीं या प्रश्नाविषयीं विस्तृत व साधार चर्चा केलेला लेख रामदास आणि रामदासी मासिकांत प्रसिद्ध केला. याच सुमारास समर्थ सांप्रदायाविषयीं चर्चात्मक असें बरें च त्यांनीं लिहिलेले लेख या च मासिकांत प्रसिद्ध झाले. सांप्रदायाच्या दृष्टीनें राजवाडयांचे हे लेख किती महत्त्वाचे आहेत याची सांप्र-

दायिकांस कल्पना होण्याकरितां या लेखांचे मथळे व प्रत्येक लेखाच्या स्वरूपाचें किंचित् दिग्दर्शन करितों.

१ श्री सांप्रदायाचे हेतु, उगम व रूप
२ एक रामदासी बाकेनिशी लेख.
३ श्रीसमर्थांचा सांप्रदाय.
४ श्रीसीताराम त्रयोदशाक्षर मंत्र आणि भोंसल्यांचें क्षत्रियत्व.
५ छत्रपतींच्या घराण्यांतील श्रीसांप्रदायाचा अनुक्रम.
६ श्रीसमर्थ आणि यादव व जाधव.
७ भीमस्वामीकृत श्रीसमर्थांच्या अंतकालाचें वर्णन.

प्रस्तुत स्थळीं या लेखांच्या स्वरूपाचें किंचित् दिग्दर्शन करणें जरूर आहे. "रामदास" या निबंधाचा प्रथमचा भाग संशोधनात्मक आहे. रामदासांचे ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचें काम महाराष्ट्रांत कोणीं कोणीं केलें, हें काम करण्यांत कशा प्रकारची धरसोड झाली आहे, याचें राजवाडयांनीं दिग्दर्शन केलें आहे. या निबंधाचा दुसरा भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. या भागांत समर्थांच्या दासबोध ग्रंथांत प्रतिपादिलेल्या तत्वांच्या स्वरूपाविषयीं बरें च विस्तृत विवेचन आहे. समर्थांच्या दासबोध ग्रंथासंबंधीं महाराष्ट्रांत आजपावेतों बऱ्या च विद्वानांनीं लेख लिहिले आहेत; परंतु राजवाडयांच्या लेखाची बरोबरी दुसऱ्या कोणत्या हि लेखास करितां येणें दुरापास्त आहे. दासबोधाची रचना कोणतें ध्येय साध्य करण्यासाठीं झाली, या ग्रंथाचें महत्त्व काय इत्यादि मुद्यांचें विवेचन राजवाडयांनीं या निबंधांत अत्यंत मार्मिकपणें केलें आहे. महाराष्ट्रीय तरुण-पिढीचें प्रेम समर्थ व त्यांचा दासबोध याच्यावर बसलें आहे. या प्रेमामुळें शेंकडों लोक हा ग्रंथ भाविकपणें वाचितात; ही गोष्ट निःसंशयपणें अभिनंदनीय आहे. पण दास-बोधाचें वाचन फलदायी व्हावें अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं दासबोधाच्या पारा-यणाबरोबर राजवाडयांच्या या निबंधाचें पुनः पुनः वाचन सुरू ठेवावें, अशी आमची नम्र सूचना आहे. अशा रीतीनें दासबोधाचें वाचन केल्यास त्याचें सार्थक होईल अशी आमची ठाम समजूत आहे. सतराव्या शतकांत महाराष्ट्रीय समाज ज्या विपन्ना-वस्थेंत पडला होता, त्या अवस्थेंतून त्याची सुटका करून स्वातंत्र्यपदावर आरूढ होण्यास व्यक्तिदृष्ट्या व समष्टिदृष्ट्या ज्या शिकवणीची आवश्यकता होती, ती शिकवण समर्थांनीं दासबोधांत उपदेशिली आहे. प्रस्तुतच्या अवनत स्थितींत हि या शिकवणीचा उपयोग आपल्यास झाल्याखेरीज राहाणार नाहीं अशी आमची समजूत आहे.

आतां आम्ही वर दर्शविलेल्या इतर लेखाच्या स्वरूपाचें क्रमशः त्रोटक दिग्द-र्शन करितों. श्रीशिवछत्रपतीस श्रीसमर्थांचा अनुग्रह केव्हां झाला, या विषयींचा वाद महाराष्ट्रांत या लेखापूर्वी कांहीं दिवस उत्पन्न झाला होता. राजवाड्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या चवथ्या खंडांत वारकरी सांप्रदायाच्या संतांविषयीं कटुभाषेंत

टीका केली आहे. याच लेखांत समर्थसांप्रदाय व वारकरी–सांप्रदाय यांची त्यांनीं तुलना करून समर्थसांप्रदायाची शिकवण छत्रपति शिवाजीमहाराजांनीं केलेल्या स्वराज्य-स्थापनेस कशी पोषक झाली, याचें वर्णन त्यांनीं अत्यंत प्रशंसापर शब्दांत केलें आहे. राजवाड्यांच्या अशा प्रकारच्या मतप्रदर्शनाच्या योगानें वारकरी सांप्रदायाच्या संता-भिमान्यांस स्वाभाविकपणेंच राग येऊन त्यांच्यापैकीं कांहीं लोकांच्या मनांत, ज्या राम-दासी सांप्रदायाची स्वराज्यास पोषक म्हणून राजवाड्यांनीं स्तुति गाइली आहे, तो स्वराज्यस्थापनेस पोषक झाला नाहीं, असें सिद्ध करण्याची कल्पना उद्भवली. समर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजीमहाराज हे समकालीन होते व स्वराज्यस्थापनेच्या प्रारंभींच्या काळांत परस्परांची भेट झाली होती, या सिद्धांतावर राजवाड्यांनीं या सांप्र-दायाच्या स्तुतीची इमारत उभारली होती. अर्थात् समर्थांची व छत्रपति शिवाजीमहा-राजांची स्वराज्यस्थापनेच्या प्रारंभींच्या काळांत गांठ पडली नाहीं; परस्परांची भेट छत्र-पतींच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत पडली, असें सिद्ध केलें म्हणजे राजवाड्यांनीं उभार-लेल्या इमारतीचा पाया व त्यावर उभारलेली इमारत हीं ढासळून पडतील, ही कल्पना वारकरी संताभिमान्यांच्या मनांत उद्भवून ती कागदपत्रांच्या आधारें सिद्ध करण्या-विषयींचे प्रयत्न त्यांच्याकडून सुरू करण्यांत आले. हे प्रयत्न ज्या कागदपत्रांच्या आधारें करण्यांत आले, त्यांचें स्वरूप, ऐतिहासिक प्रामाण्याच्या दृष्टीनें त्या कागद-पत्रांची किंमत किती इत्यादि प्रश्नांची चर्चा राजवाड्यांनीं या लेखांत केली आहे. समर्थछत्रपतींच्या भेटीच्या कालाविषयींच्या वादास अप्रत्यक्षपणें राजवाडे कारणीभूत झाले असल्याकारणानें त्यांनीं प्रतिपादिलेल्या सिद्धांताची सत्यता कागदपत्राच्या आधारें पटवून देण्याची विशेष प्रकारची जबाबदारी राजवाड्यांवर येऊन पडली. ही जबा-बदारी उत्तम रीतीनें पार पाडण्याकरितां त्यांनीं चाफळ खोऱ्यांत तत्कालीन पुरातन कागदपत्रांच्या संशोधनार्थ मुद्दाम सफर केली. या सफरींत वरील निबंधांत प्रसिद्ध करण्यांत आलेलें समर्थचरित्राविषयींचें बाकेनिशी टिपण त्यांना मिळालें; व त्याच्या आधारें त्यांनीं, श्रीशिवछत्रपतींस श्रीसमर्थरामदासस्वामींचा अनुग्रह शके १५७१ (इ० स० १६४९) त झाला हा सिद्धांत स्थापित केला आहे. बाकेनिशी टिपणाचें स्वरूप, त्याचें प्रामाण्य, त्यावरून निष्पन्न होणारे सिद्धांत इत्यादि मुद्यांची तपशील-वार चर्चा राजवाडयांनीं या निबंधांत अत्यंत मार्मिकतेनें केली आहे.

आतां "श्रीसांप्रदायाचे हेतु, उगम व रूप" या राजवाडयांच्या दुसऱ्या एका अत्यंत महत्त्वाच्या निबंधाच्या स्वरूपाचें दिग्दर्शन करण्याकडे आम्ही वळतों. समर्थांनीं महाराष्ट्रांत जी प्रचंड संघटना केली, ती कोणत्या ध्येयास्तव केली व या संघटनेंत त्यांनीं महाराष्ट्रांतील मानवी समाजापैकीं कोणकोणत्या धर्माचे, पंथाचे व संस्कृतीचे लोक सामील करून घेतले, संघटनेचें पुढारीपण सोंपविण्याकरितां कोणत्या प्रकारचे शिष्य तयार केले याचें दिग्दर्शन या निबंधांत राजवाड्यांनीं केलें आहे. श्रुतिस्मृत्युक्त धर्माची स्थापना हें समर्थांचें ध्येय होतें. या ध्येयांत समर्थांच्या मताप्रमाणें धर्मराज्याचा अथवा रामराज्याचा

समावेश होत असल्याकारणानें श्रुतिस्मृत्युक्त धर्माची स्थापना करणें हें ध्येय महाराष्ट्रीय जनतेपुढें ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें. या ध्येयाच्या सिद्ध्यर्थ समर्थांनीं अनेक शिष्य तयार करून त्यांच्या करवीं भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशांत मठस्थापना केली; व त्यांच्या अनेक शिष्यांच्याद्वारें महाराष्ट्रीय जनतेचीं मनें रामराज्याकडे अर्थात् धर्मराज्याकडे उद-योन्मुख केलीं. हें कार्य सुकर होण्याकरितां समर्थांनीं, महाराष्ट्रीय जनतेस वारकरी सांप्रदायाच्या शिकवणीनें प्रिय झालेल्या भक्तिमार्गाचा अवलंब केला. या स्वरूपाची चर्चा राजवाड्यांनीं या निबंधांत केली असून, समर्थांनीं हें ध्येय आपल्या हयातींत कसें साध्य केलें हें दर्शविलें आहे. "श्रीसमर्थांचा सांप्रदाय" या निबंधांत समर्थांच्या रामदासी सांप्रदायाचें वैशिष्ट्य त्यांनीं उकलून दाखविलें असून भरतखंडांतील प्रसिद्ध असलेल्या प्रकाश, आनंद, स्वरूप व चैतन्य यांपैकीं कोणत्या च सांप्रदायाचे समर्थ हे अनुयायी नसून त्यांचा सांप्रदाय स्वतंत्र व स्वयंसिद्ध होता; व त्यांनीं कोण-त्या हि मानवी प्राण्याला गुरु केलें नव्हतें इत्यादि मुद्दे राजवाड्यांनीं या निबंधांत विशद करून दाखविले आहेत. "श्रीसीताराम त्रयोदशाक्षरी मंत्र" व भोसल्यांचें क्षत्रियत्व या निबंधांत श्रीछत्रपतींच्या घराण्यांत समर्थसांप्रदायी या नात्यानें, जी उपासना सुरू होती, ती कोणत्या पद्धतीनें करण्यांत येत असे हें दर्शविणारा एक अस्सल लेख राजवाड्यांनीं छापला असून त्या उपासनापद्धतीवरून भोसल्यांचें क्षत्रियत्व कसें सिद्ध होतें, हें त्यांनीं दर्शविलें आहे. या च निबंधांत आपल्या सिद्धांतास पुष्टि आणण्याकरितां शहाजीराजे यांनीं विजापुरचा बादशहा अलीआदिलशहा यास लिहिलेलें एक अस्सल पत्र छापिलें आहे. या पत्रांत शहाजीनें स्वतःसंबंधीं "तरी आपण रजपूत लोक अजी तलग" इत्यादि उद्गार काढिले आहेत. त्यांवरून भोंसल्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल राजवा-ड्यांनीं काढिलेल्या सिद्धांतास चांगली च बळकटी आली आहे.

छत्रपतींच्या घराण्यांतील "श्रीसमर्थसांप्रदायाचा अनुक्रम" या राजवाड्यांच्या लेखांत समर्थसांप्रदायी या नात्यानें भोसले घराण्यांतील पुरुषांनीं सूर्योदयापासून सूर्या-स्तापर्यंत कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागत याचें तपशीलवार वर्णन केलेला एक अस्सल कागद छापिला आहे. छत्रपति शिवाजीमहाराज, त्यांचे अष्ट प्रधान व इतर सरदार लोक समर्थसांप्रदायानुयायी होते व त्या सर्वांच्या घरीं रामजन्मोत्सव, बलभीम-जन्मोत्सव करण्यांत येत असे. समर्थांच्या दासबोध व मनोबोध या ग्रंथांपैकीं कांहीं भागांचें नित्य परायण ही मंडळी करीत असत. या बाबी राजवाड्यांनीं या निबंधांत दर्शविल्या आहेत.

"श्रीसमर्थ व यादव व जाधव" या निबंधांत समर्थांचा छत्रपतिकालीन धनाजी जाधव, स्वरूपजी व पदाजी यादव यांचा गुरुशिष्यत्वाचा संबंध असल्याचें व या संबंधामुळें समर्थांनीं कऱ्हाडची देशमुखी शिवाजीराजे यांचेकडून यांना देव-विल्याचें शाबीत करणारा एक लेख प्रसिद्ध केला आहे. समर्थसांप्रदाय स्वीकारलेल्या

शिवकालीन प्रसिद्ध घराण्यांचा नामनिर्देश राजवाड्यांनीं या लेखांत केला आहे. भीमस्वामीकृत " श्रीसमर्थांच्या अंतकालाचें वर्णन " या लेखांत तत्कालीन सांप्रदायिकांवर समर्थनिधनरूपी जें संकट आलें, त्याचें हृदयद्रावक वर्णन समर्थशिष्य भीमस्वामी यांनीं ज्या लेखांत केलें आहे, तो राजवाडयांनीं छापिला असून त्या लेखाविषयीं राजवाडयांनीं थोडी चर्चा हि केली आहे. येथपावेतों उल्लेखिलेले सर्व लेख धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेकडून प्रसिद्ध होणाऱ्या " रामदास आणि रामदासी " या मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. " श्रीसांप्रदायिक विविध विषय " या नांवाच्या समेच्या रामदास आणि रामदासी ग्रंथमालेपैकीं पंधराव्या भागांत हे सर्व लेख एकत्रित केलेले जिज्ञासु वाचकांस आढळतील. आतां समर्थांविषयीं राजवाडयांनीं लिहिलेल्या दुसऱ्या एका लेखाचें स्वरूप व त्याविषयीं थोडी चर्चा करून समर्थसांप्रदायाची लेखनद्वारा राजवाडयांनीं जी अपूर्व सेवा केली, तिचें दिग्दर्शन पुरें करितों. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड तिसरा या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत समर्थरामदासस्वामी आणि ब्रह्मेंद्रस्वामी यांच्याविषयीं एक महत्त्वाचा लेख राजवाड्यांनीं प्रसिद्ध केला आहे. या लेखांत राजवाडयांनीं समर्थांचीं व ब्रह्मेंद्रस्वामींचीं तुलना केली असून परस्परांच्या गुणदोषांचें निर्भीडवृत्तीनें विवेचन केलें आहे. हा लेख जेव्हां प्रसिद्ध झाला तेव्हां या लेखामुळें महाराष्ट्रांत बरीच खळबळ उडून गेली होती. ब्रह्मेंद्रस्वामींबद्दल अभिमान बाळगणाऱ्या विद्वानांस राजवाड्यांच्या या लेखामुळें संताप आला; व समर्थाभिमानी व ब्रह्मेंद्राभिमानी विद्वानांत कांहीं दिवस तुंबळ वाग्युद्ध चालून पुढें कांहीं कालानें तें थंडावलें. या दोन व्यक्तींपैकीं कोणाविषयीं हि दुरभिमान सोडून देऊन दोघांच्या हि चरित्राचा निर्विकारपणें विचार केल्यास समर्थरामदासस्वामी हे ब्रह्मेंद्रस्वामींपेक्षां थोर व उच्च कोटींतील पुरुष होते, याविषयीं संशय राहात नाहीं. समर्थांनीं श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची स्थापना करण्याचें जें अत्युच्च ध्येय आपल्यापुढें ठेविलें होतें व ज्या ध्येयाच्या सिद्ध्यर्थ समर्थांनीं प्रचंड घटना केली तशा प्रकारचा प्रयत्न वा खटाटोप ब्रह्मेंद्रस्वामींनीं केल्याचें त्यांच्या चरित्रावरून यत्किंचित् हि आढळून येत नाहीं. ही बाब विचारांत घेतली असतां समर्थांच्या कोटींत ब्रह्मेंद्रांची गणना करणें केव्हां हि योग्य होणार नाहीं.

याप्रमाणें राजवाडयांनीं लेख लिहून सांप्रदायाची अमूल्य सेवा केली आहे. सांप्रदायिकांनीं हे लेख जरूर वाचून त्यांत ग्रथित केलेल्या तत्त्वांचा परिचय करून घ्यावा. समर्थरामदासस्वामींची शिकवण श्रीछत्रपतिशिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेस कशा रीतीनें पोषक झाली याचें दिग्दर्शन वरील लेखांत राजवाडयांनीं उत्तम केलें आहे अशी हे लेख वाचणारांची खात्री झाल्याखेरीज राहाणार नाहीं.

राजवाडयांच्या हयातींत त्यांनीं केलेल्या राष्ट्रीय कामगिरीबद्दल कृतज्ञता महाराष्ट्रीय समाजांतील सुशिक्षित व धनिक लोकांकडून क्वचितच व्यक्त केली गेली.

एखाद्या कुटुंबांतील कोणता माणूस काय योग्यतेचा आहे, हें जाणून त्याची

समावेश होत असल्याकारणानें श्रुतिस्मृत्युक्त धर्माची स्थापना करणें हें ध्येय महाराष्ट्रीय जनतेपुढें ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें. या ध्येयाच्या सिद्ध्यर्थ समर्थांनीं अनेक शिष्य तयार करून त्यांच्या करवीं भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशांत मठस्थापना केली; व त्यांच्या अनेक शिष्यांच्याद्वारें महाराष्ट्रीय जनतेचीं मनें रामराज्याकडे अर्थात् धर्मराज्याकडे उद-योन्मुख केलीं. हें कार्य सुकर होण्याकरितां समर्थांनीं, महाराष्ट्रीय जनतेस वारकरी सांप्रदायाच्या शिकवणीनें प्रिय झालेल्या भक्तिमार्गाचा अवलंब केला. या स्वरूपाची चर्चा राजवाड्यांनीं या निबंधांत केली असून, समर्थांनीं हें ध्येय आपल्या हयातींत कसें साध्य केलें हें दर्शविलें आहे. "श्रीसमर्थांचा सांप्रदाय" या निबंधांत समर्थांच्या रामदासी सांप्रदायाचें वैशिष्ट्य त्यांनीं उकलून दाखविलें असून भरतखंडांतील प्रसिद्ध असलेल्या प्रकाश, आनंद, स्वरूप व चैतन्य यांपैकीं कोणत्या च सांप्रदायाचे समर्थ हे अनुयायी नसून त्यांचा सांप्रदाय स्वतंत्र व स्वयंसिद्ध होता; व त्यांनीं कोण-त्या हि मानवी प्राण्याला गुरु केलें नव्हतें इत्यादि मुद्दे राजवाड्यांनीं या निबंधांत विशद करून दाखविले आहेत. "श्रीसीताराम त्रयोदशाक्षरी मंत्र" व भोसल्यांचें क्षत्रियत्व या निबंधांत श्रीछत्रपतींच्या घराण्यांत समर्थसांप्रदायी या नात्यानें, जी उपासना सुरू होती, ती कोणत्या पद्धतीनें करण्यांत येत असे हें दर्शविणारा एक अस्सल लेख राजवाड्यांनीं छापला असून त्या उपासनापद्धतीवरून भोसल्यांचें क्षत्रियत्व कसें सिद्ध होतें, हें त्यांनीं दर्शविलें आहे. या च निबंधांत आपल्या सिद्धांतास पुष्टि आणण्याकरितां शहाजीराजे यांनीं विजापुरचा बादशहा अलीअदिलशहा यास लिहिलेलें एक अस्सल पत्र छापिलें आहे. या पत्रांत शहाजीनें स्वतःसंबंधीं "तरी आपण रजपूत लोक अजी तुलग" इत्यादि उद्गार काढिले आहेत. त्यांवरून भोंसल्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल राजवा-ड्यांनीं काढिलेल्या सिद्धांतास चांगली च बळकटी आली आहे.

छत्रपतींच्या घराण्यांतील "श्रीसमर्थसांप्रदायाचा अनुक्रम" या राजवाड्यांच्या लेखांत समर्थसांप्रदायी या नात्यानें भोसले घराण्यांतील पुरुषांनीं सूर्योदयापासून सूर्या-स्तापर्यंत कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागत याचें तपशीलवार वर्णन केलेला एक अस्सल कागद छापिला आहे. छत्रपति शिवाजीमहाराज, त्यांचे अष्ट प्रधान व इतर सरदार लोक समर्थसांप्रदायानुयायी होते व त्या सर्वांच्या घरीं रामजन्मोत्सव, बलभीम-जन्मोत्सव करण्यांत येत असे. समर्थांच्या दासबोध व मनोबोध या ग्रंथांपैकीं कांहीं भागांचें नित्य परायण ही मंडळी करीत असत. या बाबी राजवाड्यांनीं या निबंधांत दर्शविल्या आहेत.

"श्रीसमर्थ व यादव व जाधव" या निबंधांत समर्थांचा छत्रपतिकालीन धनाजी जाधव, स्वरूपजी व पदाजी यादव यांचा गुरुशिष्यत्वाचा संबंध असल्याचें व या संबंधामुळें समर्थांनीं कऱ्हाडची देशमुखी शिवाजीराजे यांचेकडून यांना देव-विल्याचें खात्रीत करणारा एक लेख प्रसिद्ध केला आहे. समर्थसांप्रदाय स्वीकारलेल्या

शिवकालीन प्रसिद्ध घराण्यांचा नामनिर्देश राजवाड्यांनीं या लेखांत केला आहे. भीमस्वामीकृत "श्रीसमर्थांच्या अंतकालाचें वर्णन" या लेखांत तत्कालीन सांप्रदायिकांवर समर्थनिधनरूपी जें संकट आलें, त्याचें हृदयद्रावक वर्णन समर्थशिष्य भीमस्वामी यांनीं ज्या लेखांत केलें आहे, तो राजवाडयांनीं छापिला असून त्या लेखाविषयीं राजवाडयांनीं थोडी चर्चा हि केली आहे. येथपावेतों उल्लेखिलेले सर्व लेख धुळयाच्या सत्कार्योत्तेजक सभेकडून प्रसिद्ध होणाऱ्या "रामदास आणि रामदासी" या मासिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. "श्रीसांप्रदायिक विविध विषय" या नांवाच्या सभेच्या रामदास आणि रामदासी ग्रंथमालेपैकीं पंधराव्या भागांत हे सर्व लेख एकत्रित केलेले जिज्ञासु वाचकांस आढळतील. आतां समर्थांविषयीं राजवाडयांनीं लिहिलेल्या दुसऱ्या एका लेखाचें स्वरूप व त्याविषयीं थोडी चर्चा करून समर्थसांप्रदायाची लेखनद्वारा राजवाडयांनीं जी अपूर्व सेवा केली, तिचें दिग्दर्शन पुरें करितों. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड तिसरा या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत समर्थरामदासस्वामी आणि ब्रह्मेंद्रस्वामी यांच्याविषयीं एक महत्त्वाचा लेख राजवाड्यांनीं प्रसिद्ध केला आहे. या लेखांत राजवाडयांनीं समर्थांची व ब्रह्मेंद्रस्वामींची तुलना केली असून परस्परांच्या गुणदोषांचें निर्भीडवृत्तीनें विवेचन केलें आहे. हा लेख जेव्हां प्रसिद्ध झाला तेव्हां या लेखामुळें महाराष्ट्रांत बरीच खळबळ उडून गेली होती. ब्रह्मेंद्रस्वामींबद्दल अभिमान वाळगणाऱ्या विद्वानांस राजवाड्यांच्या या लेखामुळें संताप आला; व समर्थाभिमानी व ब्रह्मेंद्राभिमानी विद्वानांत कांहीं दिवस तुंबळ वाग्युद्ध चालून पुढें कांहीं कालानें तें थंडावलें. या दोन व्यक्तींपैकीं कोणाविषयीं हि दुरभिमान सोडून देऊन दोघांच्या हि चरित्राचा निर्विकारपणें विचार केल्यास समर्थरामदासस्वामी हे ब्रह्मेंद्रस्वामीपेक्षां थोर व उच्च कोटींतील पुरुष होते, याविषयीं संशय राहात नाहीं. समर्थांनीं श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची स्थापना करण्याचें जें अत्युच्च ध्येय आपल्यापुढें ठेविलें होतें व ज्या ध्येयाच्या सिद्धयर्थ समर्थांनीं प्रचंड घटना केली तशा प्रकारचा प्रयत्न वा खटाटोप ब्रह्मेंद्रस्वामींनीं केल्याचें त्यांच्या चरित्रावरून यत्किंचित् हि आढळून येत नाहीं. ही बाब विचारांत घेतली असतां समर्थांच्या कोटींत ब्रह्मेंद्रांची गणना करणें केव्हां हि योग्य होणार नाहीं.

याप्रमाणें राजवाडयांनीं लेख लिहून सांप्रदायाची अमूल्य सेवा केली आहे. सांप्रदायिकांनीं हे लेख जरूर वाचून त्यांत ग्रथित केलेल्या तत्त्वांचा परिचय करून घ्यावा. समर्थरामदासस्वामींची शिकवण श्रीछत्रपतिशिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेस कशा रीतीनें पोषक झाली याचें दिग्दर्शन वरील लेखांत राजवाडयांनीं उत्तम केलें आहे अशी हे लेख वाचणारांची खात्री झाल्याखेरीज राहाणार नाहीं.

राजवाडयांच्या हयातींत त्यांनीं केलेल्या राष्ट्रीय कामगिरीबद्दल कृतज्ञता महाराष्ट्रीय समाजांतील सुशिक्षित व धनिक लोकांकडून क्वचितच व्यक्त केली गेली.

एकाद्या कुटुंबांतील कोणता माणूस काय योग्यतेचा आहे, हें जाणून त्याची

योग्य प्रकारची तरतूद होत आहे कीं नाहीं यावर लक्ष ठेवणें, हें जसें त्या कुटुंबाच्या पुढाऱ्याचें कर्तव्य आहे, त्या च प्रमाणें आपल्या राष्ट्रांत कोणतीं गुणी माणसें आहेत, त्या गुणी माणसांचा योगक्षेम कसा चालला आहे इत्यादि गोष्टींवर नजर ठेवणें हें राष्ट्रधुरीणांचें कर्तव्य आहे. राष्ट्रांतील गुणी माणसांच्या हातून राष्ट्राला पोषक अशी कामगिरी होत असतां त्याचा योगक्षेम बरोबर रीतीनें चालत नाहीं व तो करीत असलेल्या कार्याचा उत्कर्ष द्रव्याभावामुळें होत नाहीं, असें आढळल्यास अशा माणसांस द्रव्यसहाय्य करणें हें हि राष्ट्र-पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे. राजवाडयांच्या हयातींत ते जहाल पक्षापैकीं आहेत, अशी सर्वसाधारण समजूत होती, पण ती अकारण होती. वस्तुस्थिति अशी होती कीं, ते प्रचलित राजकारणांत कधीं च भाग घेत नसत; व जहाल व मवाळ या दोन्ही पक्षांच्या पुढाऱ्यांनीं भरतखंडाच्या उद्धारार्थ चालविलेल्या प्रयत्नांच्या योगानें त्यांचें उद्दिष्ट साध्य होणें नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें. राजवाडे जहाल पक्षापैकीं एक आहेत या वृथा समजामुळें महाराष्ट्रांतील मवाळपक्षाच्या पुढाऱ्यांनीं राजवाडयांकडे यत्किंचित् हि लक्ष दिलें नाहीं. राहातां राहिले जहाल पुढारी. त्यांनीं हि राजवाडयांकडे दुर्लक्ष केलें. राजवाडयांचा स्वभाव अत्यंत निस्पृही व बाणेदार होता, यामुळें दुसऱ्यापुढें तोंड वेंगाडून याचना करणें त्यांना कधींच पसंत नव्हतें, व तसें त्यांनीं कधीं हि केलें नाहीं. या त्यांच्या वृत्तीमुळें महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें लक्ष त्यांचेकडे वेधलें गेलें नाहीं हें खरें आहे. तथापि राजवाडयांच्या बाबतींत महाराष्ट्रीय पुढाऱ्यांकडून उचित असें कर्तव्य बजावलें गेलें नाहीं, या आरोपांतून मात्र ते मुक्त होऊं शकत नाहींत. राजवाडयांनीं आपल्या आयुष्याचीं तीस पस्तीस वर्षें अत्यंत खडतर स्थितींत काढिलीं. राजवाडयांसारखा किती हि बळकट मनाचा मनुष्य असला तथापि त्यानें केलेल्या स्वार्थत्यागाचें चीज महाराष्ट्रांत किती अल्प प्रमाणांत होत आहे, हें पाहून त्यांचें मन निराशा व उद्विग्नता यांत कधीं कधीं बुडून जात असे. अशा प्रकारच्या निराशेच्या व उद्विग्नतेच्या भरांत राजवाडयांचें मन बुडून गेलें म्हणजे महाराष्ट्राच्या कोणत्या हि पुढाऱ्यांकडून त्यांच्या स्वार्थत्यागाचें चीज होत नाहीं याबद्दल त्यांच्या तोंडातून कटु शब्द निघत. परंतु अशा प्रकारच्या तात्पुरत्या येणाऱ्या लहरींच्या योगानें ते आपल्या ध्येयापासून कधीं हि च्युत झाले नाहींत अगर अंगीकृत कार्याच्या मदतीसाठीं कोणा हि पुढाऱ्याकडे द्रव्याची याचना करण्यास हि ते कधीं गेले नाहींत.

राजवाडयांच्या मनाच्या अशा प्रकारच्या वृत्तींतून उगम पावलेले खालील विचार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत :—

ऐतिहासिक विविध विषय पान ३७४

" विद्यावंत, बुद्धिमंत व प्रतिभावंत व्यक्तींचा अवमान आपल्या जुन्या संस्कृत शास्त्रांत जसा तसा च नवीन पाश्चात्य समाजशास्त्रांत हि अत्यंत गर्हणीय व हानिकारक गणला आहे.

अधिगतपरमार्थान् पंडितान् मावमंस्थाः





अनुक्रमणिका

असें संस्कृतवचन आहे; व त्या सारखीं च श्रुतिस्मृतिग्रंथांत अनेक वचनें आहेत.

हा संस्कृत उतारा कदाचित् जुनापुराणा भासेल, सबब एका पाश्चात्य समाजशास्त्र्याचा उपदेश तरी परप्रत्ययनेयबुद्धींना ग्राह्य वाटण्याचा संभव असेल अशा समजुतीनें तो येथें दाखल करितों. समाजशास्त्री लिहितो :—

> " In nothing whatever can a nation so ill afford to be wasteful as in her men and women who combine genius with the highly developed social nature. What, then, shall we say of those people that deliberately distroy such elements of the population by death, inprisonment and other kind of persecution."

समाजशास्त्र्यानें Death, imprisonment व persecution हीं तीनच कारणें प्रतिभेच्या नाशाचीं यूरोपांतील दिलीं आहेत. आपल्या ह्या देशांत प्रतिभाक्षयाचें निराळें च कारण आढळून येतें. तें Indifference उर्फ Neglect हें होय. Neglect नें तर प्रतिभेचा नाश बेमालूम होतो. आणि प्रतिभेचा नाश म्हणजेच राष्ट्राचा नाश होय.

आतां तरी पुढें । हा चि उपदेश ।
नका करूं नाश । प्रतिभेचा ॥ १ ॥

राजवाड्यांचे हे उद्गार अत्यंत महत्त्वाचे व राष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं सतत लक्षांत बाळगण्यासारखे आहेत.

---

# हेमचंद्राची देशीनाममाला उर्फ रत्नावली

(लेखकः—प्रल्हाद धोंडो कानिटकर, बी. ए., एल्‌एल्. बी.)

हेमचंद्र हा जैन पंडित असून, अन्हिलवाडपट्टण येथें राज्य करीत असलेले जयसिंग उर्फ सिद्धराज व कुमारपाल यांच्या दरबारीं होता. त्यानें व्याकरणशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले असून, देशीनाममाला या नांवाचा देशी शब्दांचा एक कोश प्राकृत (महाराष्ट्री) भाषेंत लिहिला आहे. त्या संबंधीं या लेखांत माहिती देण्याचा विचार आहे. तथापि त्याचेपूर्वी, हेमचंद्रासंबंधीं माहिती दिली असतां अस्थानीं होणार नाहीं असें समजून डॉ. श्रीपाद कृष्ण बेलवलकर, M.A, Ph. D. यांच्या Systems of Sanskrit Grammar या ग्रंथाचे आधारें हेमचंद्राची चरित्रविषयक माहिती संक्षिप्त रीतीनें देत आहे.

हेमचंद्राचा जन्म कार्तिक शु॥ ९ विक्रम संवत् ११४५ (शके १०१०) रोजीं अहमदाबाद जिल्ह्यांत धुंधुका या गांवीं झाला. त्याच्या पित्याचें नांव चचिग व आईचें नांव पहिनि. त्याचें पहिलें नांव चांगदेव असें ठेविलें होतें. जैन भिक्षु देवचंद्र यानें चांगदेवास तो पांच वर्षांचा असतांना धर्मकार्यार्थ मागून घेतलें, व त्यास खंबायत येथें जैन धर्माची दीक्षा दिली, त्यावेळीं त्याचें नांव सोमचंद्र ठेवण्यांत आलें, पुढें बारा वर्षें त्यानें अध्ययन केलें, व तदनंतर त्यास सूरि उर्फ आचार्य ही पदवी देण्यांत आली, व त्याचें पुन्हां नामकरण होऊन हेमचंद्र हें नांव ठेवलें, पुढें सिद्धराज याचे दरबारीं त्यास आश्रय मिळाला, व तो मरेपर्यंत (शके १०९४) तेथें होता. त्यानें दोन कारकीर्दी पाहिल्या. सिद्धराज व त्याचा पुतण्या कुमारपाल हे शैव होते. कुमारपालावर त्यानें आपल्या विद्वत्तेची इतकी छाप बसविली कीं अखेर कुमारपालानें जैनधर्माची दीक्षा घेतली.

हेमचंद्रानें पाणिनीय व्याकरणाप्रमाणें सिद्धहेमचंद्र नांवाचें संस्कृत व्याकरण रचिलें. त्याचे अध्याय ८ असून त्यांत सुमारें ४५०० सूत्रें आहेत. यांपैकीं सुमारें १०००–११०४ सूत्रें आठव्या अध्यायांत असून त्यांत प्राकृत व अपभ्रंशभाषांचा विचार केला आहे. त्यानें आपल्या सूत्रांवर शब्दानुशासनबृहद्‌वृत्ति नांवाची टीका लिहिली आहे. तसेंच त्यानें भट्टिकाव्याच्या धर्तीवर द्याश्रयमहाकाव्य नांवाचा पद्यात्मक ग्रंथ लिहिला आहे. हैमधातुपाठ, उणादिसूत्रें, लिंगानुशासन, गणपाठ, परिभाषासूत्रें वगैरे त्याचे व्याकरणविषयक ग्रंथ आहेत; व देशीनाममाला नांवाचा देशी शब्दांचा एक कोश आहे व या लेखाचा तोच प्रधान विषय आहे तिकडे आतां वळूं.

२ मराठी भाषेच्या अभ्यासकानें देशीनाममाला व हैमव्याकरणाचा आठवा अध्याय अवश्य वाचावा. हेमचंद्राच्या मृत्यूनंतर १०० वर्षांनीं ज्ञानेश्वरांचा जन्म झाला. शके १२१२ मधील ज्ञानेश्वरींतील नामें, सर्वनामें, क्रियापदें व अव्ययें यांचें पूर्व-

स्वरूप हैमव्याकरणाच्या आठव्या अध्यायांत दृष्टीस पडतें. कै. राजवाडे यांनीं ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत अपभ्रंश व जुनाट मराठीचीं जीं रूपें दिलीं आहेत तीं आठव्या अध्यायास धरून आहेत. संस्कृत भाषेचा आद्य व्याकरणकार जसा पाणिनी तसा प्राकृत भाषेचा आद्य व्याकरणकार वररुचि ऊर्फ कात्यायन होय. हेमचंद्रानें धात्वादेश-प्रकरण वररुचीपेक्षां जास्त विस्तारानें लिहिलें आहे. यासंबंधीं स्वतंत्र लेखांत विचार होईल.

## देशीनाममाला ऊर्फ रत्नावली

३. देशीनाममालेचें इंग्रजी भाषांतर प्रो. पिशेल व डॉ. बूल्हर यांनीं ईसवी सन १८८० सालीं प्रसिद्ध केलें आहे. देशीनाममाला कविताबद्ध प्राकृत भाषेंत लिहिली आहे. तिचे आठ वर्ग असून ते अकार विल्हयानें दिले आहेत. प्राकृत भाषेंत ऋ, ॠ, ऌ, ॡ, ऐ, औ, हे सहा स्वर नाहींत. तसेच श, ष, न, य हीं चार व्यंजनें नाहींत. अस्सल देशी शब्दाला प्राकृत भाषेचा पेहराव चढवून ते दिले आहेत. प्राकृत भाषेंत "न" बद्दल नियमानें "ण" होतो. यामुळें णकारानें आरंभ होणारे शब्द आहेत. देशीनाममालेचे आठ वर्ग खालीलप्रमाणें आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ओ । | श्लोक० | १७४ |
| २ | क, ख, ग, घ । ...... | ...श्लोक० | ११२ |
| ३ | च, छ, ज, झ । ....... | ...श्लोक० | ६२ |
| ४ | ट, ठ, ड, ढ, ण । ... | ....श्लोक० | ५० |
| ५ | त, थ, द, ध । ... | ....श्लोक० | ६३ |
| ६ | प, फ, ब, भ, म । .... | ...श्लोक० | १४८ |
| ७ | र, ल, व । | ....श्लोक० | ९६ |
| ८ | स, ह । | ....श्लोक० | ७७ |
| | | | ७८२ |

हेमचंद्र स्वतः या शब्दसंग्रहास रत्नावली असें नांव देतो; हा संग्रह व्याकरणाच्या पुरवणीदाखल लिहिला आहे हें खालील श्लोकावरून दिसेल.

इअ रयणावलिनामो देसी सद्दाण संगहो एसो ।
वायरणसेसलेसो रइओ सिरिहेमचन्दमुणिवइणा ॥
इति रत्नावलीनाम देशीशब्दानां संग्रह एषः ।
व्याकरणशेषलेशो रचितः श्रीहेमचंद्रमुनिपतिना ॥

देशी शब्द अनंत आहेत यामुळें रत्नावलींत सर्व देशी शब्दांचा अंतर्भाव झालेला नाहीं व ती गोष्ट प्रत्यक्ष बृहस्पतीलाहि अशक्य आहे असें हेमचंद्र म्हणतो;

वाचस्पतेरपि मतिर्न प्रभवति दिव्ययुगसहस्रेण ।
देशेषु ये प्रसिद्धास्तान् शब्दान् सर्वतः समुच्चेतुम् ॥

या शब्दसंग्रहांत दोन प्रकारचे शब्द दिल्याचें हेमचंद्र सांगतो, ते प्रकार असेः—

(१) लक्षणे (शब्दशास्त्रे) सिद्धहेमचंद्रनाम्नि ये न सिद्धास्तेऽत्र निबद्धाः।
(२) ये संस्कृताभिधानकोशेषु न प्रसिद्धाः तेऽप्यत्र निबद्धाः।

ज्यांची व्युत्पत्ति व्याकरणशास्त्रानें होत नाहीं किंवा संस्कृत कोशांत जे प्रसिद्ध नाहींत असे दोन प्रकारचे शब्द रत्नावलींत दिले आहेत. तथापि कांहीं देशी शब्दांची व्युत्पत्ति देतां येते ही गोष्ट डॉ. भांडारकर व डॉ. गुणे यांनीं सिद्ध केली आहे. पुढें वर्गानुक्रमानें वर्तमान मराठींत प्रचारांत असलेले देशी शब्द दिले आहेत व कंसांत त्या शब्दांचे कांहीं ठिकाणीं मराठी पर्याय दिले आहेत. हेमचंद्राच्या देशी शब्दसंग्रहांत मराठी, गुजराथी, कानडी, वऱ्हाडी वगैरे भाषेंतील शब्द आहेत तेहि त्या त्या स्थळीं दर्शविले आहेत.

## ४ अ वर्ग (१)

१ अव्वा, अम्मा, अम्वा = जननी. २ अक्का = भगिनी. ३ अडो=कूपः. ४ अलिणो = वृश्चिकः. ५ अत्ता = माता, पितृष्वसा, श्वश्रू. ६ आगिओ = इंद्रगोपकीटः ७ उम्वी=पक्वगोधूमः (ओंव्या). ८ उल्लुट्टं = मिथ्या (उलट). ९ उम्मरो = गृहदेहली (उंबरा). १० उज्जडम् = उद्वसम् (उजाड). ११ उडिदो=माषधान्यम्. १२ उन्दुरो =आखुः (उंदीर). १३ उक्कुरडी = अवकरराशिः (उकिरडा). १४ उत्थल्लपथल्ल = पार्श्वद्वयेन परिवर्तनम् (उलथापालथा). १५ उत्तिरिविडी=ऊर्ध्वोर्ध्वम् भांडादेः स्थापनम् (उतरंड). १६ऊआ=यूका (ऊ). १७ उसणं=गतिभंगः (उसण). १८ उसअं = उपधानम् (उसें). १९ एक्कोः=स्नेहपरः २० एक्केक्कमम् = अन्योन्यम् (एकमेक). २१ ओग्गालो (ओघळ) अल्पं स्रोतः. २२ ओसरिआ=अलिंदः (ओसरी). २३ ओहाडणी=पिधानी (ओढणी). २४ उज्जग्गिरम्=औन्निद्यम्.

**टीप**:—१ अव्वा—कानडी. ४ ज्योतिषांत आहे. ५ अत्या = आई (देशस्थांत रूढ आहे; पितृष्वसा सर्व साधारण आहे. अत्या आत = सासू. हा अर्थ विठ्ठलाचे काव्यांत आला आहे :—

सुनेसी पुसे पूर्ण धालीसि बाई। वदे रुक्मिणी तृप्त मी आत बाई॥ रु. स्व. सर्ग ७ श्लो. ६४

६ गुजराथी भाषेंत रूढ आहे (Glow-worm). १९ वऱ्हाडांत रूढ आहे. २३ गुजराथी भाषेंत आहे. २४ जागरण.

थोडे तुज घरीं होती उजगरे। देउळासी कां रे मरसी जातां॥ तुकाराम, अभंग २९९३
चित्रशाळा गाथा, शके १८४७

## ५ क वर्ग (२)

१ कट्टारी = क्षुरिका (कट्यार). २ कंपडो = पथिकः (कापडी). ३ कयारो = तृणाद्युत्करः. ४ कीरः = शुकः. ५ कुडिआ = वृतिः (कूड). ६ काहारो = जलादिवाही कर्मकरः. ७ कुल्हो = श्रृगालः. ८ कुहडो = कुब्जः (कुभडा – कुबडा) ९ कोट्टं = नगरम्. १० कोलित्तम् = उल्मुकम् (कोलीत, कोलत्या नाचविणें). ११ करडो=कर्बुरः.

१२ कुरुलो = कुटिल केशः (कुरळे केंस). १३ कोलिओ = तंतुवायः (Spider). १४ खइं = श्मश्रु. १५ खव = स्कंधः (खवाटा). १६ खण्पडो = रूक्षः (खप्पड). १७ खाट्टिको = सैनिकः (खाटीक). १८ खडक्की = लघुद्वारम् (खिडकी). १९ खोलो = वस्त्रैकदेशः (खोळ). २० गढम् = दुर्गम् (किल्ल्याचा गढी). २१ गंडीरी = इक्षुखंडम्. २२ गोच्छा = मंजिरी (गुच्छ). २३ घुणघुणिआ = कर्णोपकर्णिका (गुणगुण). २४ कच्छरो = पंकः (कचरा). २५ कल्होडी = वत्सतरी (कालवड). २६ घग्घरो = जघनस्थवस्त्रभेदः (घागरा).

टीप :— ३ या पासून 'केर' हा शब्द आला असावा; ४ कीर शब्द संस्कृतहि आहे; ६ वऱ्हाडांत धंदेवाईक पाणी भरणारांची 'काहारी' म्हणून एक जात आहे; ९ राजकोट, बाणकोट वगैरे शहरांच्या नांवांत हा शब्द आढळतो; ११ करडा नाम पाटलः । ( राजव्य० कोश श्लो० १६५); १३ मराठींत "कोळी" १४ यावरूनच खांड, खाडु, हे शब्द निघाले असावेत.

मिशा पिंगटा खांड आरक्त डोळे। ( विठ्ठल रु. स्वयंवर सर्ग ६ श्लो. २२)

१९ ज्ञानेश्वरींत आढळतो. अथवा निधान हें प्रगटलें । म्हणोनि खदिरांगार खोळे भरिले ॥ ( ज्ञा. अ. ९ ओवी १४९) २६ गुजराथी भाषेंत रूढ आहे.

### ६ च-वर्ग (३)

१ चंगं = चारु (ज्ञानेश्वरींत चांगः सांप्रत, चांगलें ). २ चउक्कम् = चत्वरम् ( सं. चतुष्कम् मराठी, चौक). ३ चाउला = तंडुला. ४ चिक्खल्लो = कर्दमः (चिखल). ५ चिरचिरा = जलधारा (पावसाची चिरचिर). ६ चुडुली = उल्का (चुडी पेटविली. ७ चूडो = वलयावलिः (लगिन चुडा). ८ छल्ली = त्वक् (साल). ९ छिण्णालो = जारः ( छिनाल; शिनळ ). १० जिमिअम् = भुक्तम्. ११ जोण्णलिआ – जोवारी = धान्यम् ,(जोंधळा, ज्वारी). १२ झडी = निरंतर वृष्टिः (पावसाची झड). १३ झुलुंकिअम् = दग्धम् (झळ, झळई लागली). १४ झाडम् = लता गहनम्. १५ झुट्टम् = अलीकम् (झूट बात). १६ झसिअम् = पर्यस्तमाकुष्टं च। १७ झरओ = सुवर्णकारः (झारे लोक; झारेकरी)

टीप :— ३।१५ हिंदी भाषेंतील शब्द; ७।१० गुजराथी; १६ मराठी 'झांसा' या पासूनच झाला असावा. तळमळ, धास्ती. (१) नको घालूं झांसा । मना उपाधी वोळसा ॥ तुकाराम अभंग ३३८१ (२) तारगणे मुगतापण दाऊन जिंति जगत्त्रय लाऊन झासा । राधा मा. वि. चंपू पृ. २६६. सामराज व नागेश यांच्याहि काव्यांत 'झांसा' शब्द आढळतो.

### ७ ट-वर्ग (४)

१ टिक्कम् = तिलकम् (टीक, टीकला). २ टोलो = शलभः (टोळ). ३ डव्वो, डावो = वामकरः (डावा हात). ४ डंवरो = धर्मः. ५ डाली = शाखा (डाहळी). ६ डोलो = लोचनम् (डोळा). ७ डुंबो = श्वपचः (डोंब). ८ डुंगरो = शैलः (डोंगर). ९ डोला = शिबिका. (डोली). १० ढंकुणो–ढेंकुणो, ढेंकूण. ११ ढंढरिओ = कर्दमः १२

ढड्डो = भेरी. १३ ढंढरो–ढयरो पिशाचः. १४ ढंढासिओ ग्रामयक्षः। १५ णत्या= नासारज्जुः (नथी, नथनी). १६ णंदा, णंदी, णंदिणी = गोवाचकाः (नंदा, नंदी, नंदिनी). १७ णाचिरो = रमणशीलः (नाचरा). १८ णहमुहो (नखमुखः) = घूकः (घुबड). १९ णमसिअम् = उपयाचितकम् (नवस करून मागितलेलें नवासिक). २० णिज्जो = सुप्तः (निजलेला). २१ णिप्पट्टो = अधिकः(निपट). २२ णिव्वडइ=पृथक् स्पष्टो वा भवति (निवडून निघतो.) २३ णक्को = घ्राणम् (नाक). २४ णलअम् = उशीरम् (नलद=वाळा).

**टीप** :— १ राधामाधवविलासचंपूंत आढळतो.

टिकेचा धणी लेक ज्याचा शिवाजी। पृ. २६७

४ या पासून मराठींत 'डंवरणें' हें क्रियापद झालें आहे; तो घामानें डंवरला.

७ हरिश्चंद्र आख्यानांतील डोंब प्रसिद्ध आहे.

९ राज व्य. कोशांत डोली शब्द आला आहे.

शिविका पालखी डोली सुखासनमिति द्वयम्। तुल्यम् भाषाद्वये। श्लो० ३०

२१ तुकाराम, सामराज यांच्या काव्यांत आढळतो. (१) निपट मज न चले अन्न पायली गहूं सांजा तीन ॥ (तुका० अभंग २९५७) (२) सामराजाच्या रु. हरणांत सुमारें १०० वेळां आला आहे. २४ शुद्ध सर्वांग कुश नलद, परि उपभोगोचितत्व नळदासी ॥ मोरोपंत, वनपर्व अ. ४।७५ (१५) पासून 'नथ' हा शब्द निघाला असावा; (२०) पासून नीज = निद्रा हा शब्द निघाला असावा.

## ८ त–वर्ग (५)

१ तलारः = नगररक्षकः. २ तडफडिअम् = परितः चालितम् (मराठी) तडफडणें, तडफडला). ३ तुंडीरम् = मधुरबिंबम् (तोंडलें). ४ तेअवइ = प्रदीप्यते. ५ तुलसी = सुरसलता. ६ थट्टी = पशुः ७ थरहरिअम् = कंपितम् (थरथरणें). ८ थेवो = बिंदुः ९ दवरो = तंतुः. १० दोरो = कटिसूत्रम्. ११ दोग्गम् = युग्मम् (दोघे).

**टीप** :-- (१) मराठी पर्याय 'तराळ'. हे प्रत्येक खेड्यांत आहेत; बेळगांवच्या बाजूस "तळवार" आहेत. तोहि शब्द 'तलार' पासूनच प्रचारांत आला असावा. (४) या पासून "तेवणें" हें क्रियापद मराठींत आलें आहे. (६) राजव्यवहार कोशांत "थटी गोवाटिका नाम। श्लो० ३६६" यांतील थाटी हा शब्द थट्टी पासूनच आला आहे. संस्थानांत "थट्टीकामगार नांवाचा. एक अधिकारी असतो. (८) थेवो–वर्तमान मराठींत थेंब. (९) दवरो = मराठींत "दोरा". (१०) दोरो–कडदोरा ( कटिदोरा ) या शब्दांत 'दोरो याचा अपभ्रंश दृष्टीस पडतो.

## ९ प–वर्ग (६)

पड्डी = प्रथम प्रसूता. २ पलही = कार्पासः ३ पक्खर = तुरगसंनाहः ४ पत्तलं = कृशम् ५ परिअट्टो = रजकः (परीट) ६ पइट्ठाणं = नगरम् ७ पाणद्धि = रथ्या. ८ पिल्लूम् = लघुपक्षिरूपम् (पिल्लुं) ९ पोट्टम् = उदरम् (पोट). १० पोआलो = वृषभः (पोळ, पोळा (सण) ) ११ पासल्लं = तिर्यक् (मराठींत, पासला) १२

फुक्का = मिथ्या (फुकाचं, फुकट, एकीबेकीच्या खेळांत फुक्की). १३ फडं = सर्पस्य सर्व शरीरं, फणश्च (फडा = सापाची). १४ फोडिअयं=राजिकाधूमितं शाकादि. फोडणी १५ बप्पो = पिता (बाप). १६ बरुअम् = इक्षुसदृशम् तृणं, बोरू—ज्याच्या लेखण्या करतात). १७ बइल्लो = बलीवर्दः (बैल). १८ बाउल्ली = पंचालिका (भाउली—मुलींची) १९ बुक्का = मुष्टिः (बुक्की). २० बुलंबुला = बुद्बुदः (बुडबुडा). २१ बोड्डरं = स्मश्रु (डोई बोडणें). २२ बोंडम् = चूचुकम् (बोंडशी). २३ बोक्कडो = छागः (बोकड). २४ भल्लुंकी = शिवा (भालु). २५ भंडणम् = कलहः (भांडण). २६ भाओ = ज्येष्ठ भगिनीपतिः. २७ भाउज्जा = भातृजाया. २८ भिंगम् = कृष्णम्. २९ भेडो = भीरुः (भ्याड.) ३० मग्गो=पश्चात् (मग = नंतर). ३१ मट्टो = अलसः. (मठ्ठ). ३२ मम्मी—मामी = मातुलानी. ३३ मंगुसो = नकुलः(मुंगूस). ३४ महालवक्खो = भाद्रपदे श्राद्धपक्षः. ३५ मुद्दी = चुंबितम्. ३६ मुअंगी = कीटिका (मुंगी) ३७ मेंठी = मेंढी. ३८ मइल = गततेजः (मैला). ३९ मलओ = गिर्येकदेशः, उपवनंच. ४० मेहुणिआ = पत्न्या भगिनी; मातुलात्मजा.

**टीप :—** (३) ज्ञानेश्वरकाळीं 'पाखर' शब्द प्रचारांत होता. राजव्यवहारकोशांतहि "पाखर" शब्द दिला आहे. स्यादश्वकवचं पाखर् । श्लो० १५२

(४) हिंदी भाषेंत 'पतला' = Thin' असें रूप प्रचलित आहे. (६) पैठण. (७) ज्ञानेश्वरींत आढळतो; हल्लीं प्रचारांत "पाणंद-ध" या पासूनच आला आहे; व त्याला विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे; पाणंद = ओढ्याच्या कांठची वाट. (खेड्यांत रूढ आहे) २६ मराठे लोकांत मेहुण्याला 'भावोजी' म्हणतात. २७ मराठी शब्द 'भावजय'. २८ अतिशय "काळा" या अर्थी मराठींत "काळाकभिन्न. काळाभिन्न" असे शब्द योजतात; त्यांतील 'भिन्न' हें रूप 'भिंगम्' याचें असावें. ३२ कानडी भाषेंतील शब्द आहे. ३४ महालपक्ष याचें प्राकृत भाषेंतील रूप. ३५ कानडी भाषेंत "मुद्दु = चुंबन" हा शब्द सांप्रत रूढ आहे. ३९ माळ = गिर्येकदेशः। हल्लीं भाषेंत रूढ आहे; मळा = फळझाडांचा बाग, किंवा बागाईत जमीन असा अर्थ हल्लीं मराठींत आहे. ४० "मराठींत "मेहुणी-मेव्हणी". मिथुन शब्दाचें प्राकृतांत (महाराष्ट्री) "मिहुण" असें रूप होतें त्यावरून मराठींत "मेहुण = दंपती" शब्द आला आहे. 'मेहुणिआ' या शब्दाचा 'मिथुन—मेहुण' याच्याशीं संबंध दिसत नाहीं.

## १० र-वर्ग (७)

१ रल्ला, राला, राअला = प्रियंगु (राळा). २ रसद्दम् = चुल्लीमूलम्. ३ रंजणो = घटः (रांजण). ४ रिंगो = प्रवेशः (मराठींत 'रीघ', रिघाव). ५ रूअम् = तूलं सरक्या काढलेल्या कापसाला 'रूं' म्हणतात). रूवी = अर्कद्रुमः (रुईचें घाड). ७ रुंदो = विपुलः (मराठी—रुंद = Broad). ८ लक्कुडम् = लकुटः (लांकूड). ९ लामा = डाकिनी (मराठी "लाव = पोरें खाणारी). १० लल्लं = सस्पृहं (लोल). ११ वंगं = वृंताकम् (वांगें). १२ वरओ = शालिभेदः (वऱ्याचे तांदूळ). १३ वणवो = दवाग्निः (वणवा). १४ वहुण्णि = ज्येष्ठ भार्या. १५ वलग्गई = आरोहति (ओलंघणें). १६

वोज्झओ भारः (ओझें = Load). १७ वेल्लहलो = कोमलो, विलासी. (जुन्या काव्यांत "वेल्हाळ" शब्द येतो तो यापासूनच झाला आहे.

**टीपः**—२ हिंदी भाषेत 'रसोडा' = स्वयंपाक करण्याची जागा" हा शब्द या शब्दापासून बनला आहे. १४ ज्येष्ठ बंधूच्या बायकोला "वहिनी" म्हणण्याचा महाराष्ट्रांत प्रघात आहे.

### ११ स-वर्ग (८)

(१) सरा = माला (सर). २ सोहणी = संमार्जनी. ३ सामरी = शाल्मली (सावरीचें झाड). ४ सिंदी = खर्जूरी. ५ सूरणो = कंदः. ६ सेट्टी = ग्रामेशः. ७ सायं = महाराष्ट्रदेशे पत्तनविशेषः. ८ सायंदूरं = महाराष्ट्रदेशे पत्तनविशेषः. ९ अहड्डं = अस्थि (हाड = Bone). १० हाल्लिअम् = चलितम् (हालला). ११ हरिआली = दूर्वा (हरळी). १२ हेरिंबो = विनायकः (गजानन).

**टीपः**— २ देशी 'कयार + सोहणी' = मराठी "केरसुणी" (Broom) ५ सुरण = विशिष्ट भाजीचा कंद ( सुरणाची भाजी ) ६ लिंगाइतांत "शेट्टी" व मद्रासकडे "चेट्टी" आडनांवें आहेत; तीं 'सेट्टी' शब्दावरूनच बनलीं आहेत; मराठे लोकांत "शेटिबा" हें विशेषनाम आहे. ८ सायं-दूर = हल्लींचें "सोंडूर संस्थान" असावें असें वाटतें.

१२ येथवर देशीनाममालेंतील निवडक शब्द दिले आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, हेमचंद्रानें दिलेले देशी शब्द एकाच भाषेंतील नाहींत. मराठी भाषेंत महाराष्ट्री व अपभ्रंश भाषेपासून उत्पन्न झालेले शब्द व तत्सम शब्द मोठ्या प्रमाणांत आहेत; बाकीचे शब्द देशी ( निव्वळ मराठी) व इतर भाषेंतीलहि मराठींत रूढ झाले आहेत. हेमचंद्र गुजराथेंत रहात असल्यामुळें महाराष्ट्रांतील सर्व देशी शब्दांचा अंतर्भाव देशीनाममालेंत झाला नाहीं व होणेंहि शक्य नव्हतें. ज्ञानेश्वरींत सर्व शब्द तद्भव तत्सम व देशी आहेत. त्यांपैकीं कांहीं देशी शब्द हेमचंद्रानें दिलेले नाहींत; डुडुल = घुबड, कऱ्हा = उंट, आंवुला = नवरा. आंवुली = बायको इत्यादि. मराठी भाषेंत अल्प प्रमाणांत कानडी शब्द रूढ झालेले आहेत ही गोष्ट अनेक विद्वानांनीं सिद्ध केली आहे. ( वकट, लेंड, मुंड, अडगुल मडगुल सोन्याचं कडवुळ; अवडक चवडक दामाडू; वगैरेबद्दल " चित्रमयजगत् " मध्यें वळोवेळीं लेख प्रसिद्ध झाले आहेत) मराठींतील "तूप" हा शब्द कानडी आहे. हेमचंद्र गुर्जर राजाचा आश्रित होता यामुळें गुजराथी शब्द नाममालेंत येणें साहजिक असून तें अपरिहार्यहि होतें. तेव्हां गुजराथी शब्दांचा भरणा बराच आहे यांत आश्चर्य नाहीं; उदा० आगिओ, घागरो, ओढणी, घोडो, आणंदवडो, इत्यादि. चावल, छिनाल, पतला, कहारो, एक्को वगैरे हिंदी शब्दहि देशी म्हणून दिले आहेत.

१३ राजव्यवहारकोशांत यावनी शब्दांचा संग्रह असून त्यांस संस्कृत प्रतिशब्द दिल्याचें कोशकार सांगतो; कृते म्लेंच्छोच्छेदेयवनवचनैर्लुप्तसरणिम् । परंतु सर्व शब्द यावनी नसून त्यांत कांहीं देशी व हिंदी शब्द असल्याचें रा. ब. का. ना. साने

यांनीं आपल्या प्रस्तावनेंत नमूद केलें आहे (शिवचरित्र प्रदीप–पृ. १७६–७७) व ती गोष्ट देशीनाममाला पाहिली असतां कोणासहि पटेल. उदाहरणार्थ रा. व्य. कोशांतील "राजवर्ग" यांतील शब्द खालीं देतों:—

(१) जलमाब् इति प्रोक्तम्। आब् शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत आप् = जलम् या पासून साधतां येते.

(२) बिजली विद्युत्। विद्युत् शब्दाचें महाराष्ट्री प्राकृत रूप–विद्युत्पीताभ्यां लः। ४–२६ या वररुचीच्या सूत्राप्रमाणें विज्जुली असें होतें; व बवयोरैक्यत्वात्। या सूत्राप्रमाणें हिंदी भाषेंत "बिजली" असा शब्द झाला आहे.

(३) मेहु: पर्जन्य उच्यते। संस्कृत शब्द "मेघ:" या पासून महाराष्ट्री प्राकृतांत "मेहो" असा शब्द होतो; व तो ज्ञानेश्वरींतहि आढळतो. यावरून "मेहु" हा शब्द हिंदी अगर यावनी नसून केवळ तद्भव आहे.

(४) पलंगो मंचकः। संस्कृत "पर्यंक" याचें महाराष्ट्री प्राकृत रूप "पल्लंक" असें होतें व त्यावरून मराठींत पलंग हा शब्द आला आहे.

देशीनाममालेंत राजव्यवहारकोशांतील करडा, डोली, थट्टी, पाखर वगैरे शब्द आले आहेत यावरून ते शब्द यावनी नाहींत अशी खात्री पटेल.

१४ येथवर केलेल्या प्रपंचावरून देशीनाममालेचें महत्त्व व साधारण रूपरेषा समजून येईल अशी आशा आहे. सांप्रत मराठी शब्दांचा प्रचंड कोश तयार होत आहे; त्यांत देशीनाममालेंतील शब्दांचा अंतर्भाव–केला नसल्यास–होणें जरुरीचें आहे. ज्ञानेश्वरपूर्वकालीन– शिलालेखाशिवाय–फारसें वाङ्मय उपलब्ध नाहीं. तेव्हां ज्ञानेश्वरापूर्वी मराठी शब्द कोणते अस्तित्वांत होते याची कल्पना त्रुटित व अस्पष्ट शिलालेखांवरून करण्यापेक्षां असलेल्या साहित्याचा उपयोग केल्यास जुनाट मराठी शब्दांचा अर्थबोध होण्यास कोशाचा खरा उपयोग होईल. देशीनाममालेंत हिंदी व गुजराथी शब्द आहेत ही गोष्ट प्रो. श्री. नी. चापेकर यांनीं लेखकाच्या निदर्शनास आणली त्याबद्दल त्यांचे आभार मानून हा लांबलेला लेख पुरा करितों.

---

# चित्पावनी भाषाचो नमुनो.

(लेखक :– कृष्णाजी गोविंद साठे, पेन्शनर हेडमास्तर, गोठणें देवाचें, जि. रत्नागिरी).

(एक जरंडी बायाको नुकतोच आयलेलो आपलो भाचोश बघनी तेचेजवळ बोलली तां भाषण :–)

बाबी, केडला आयलोश? सगळीं खुशाल सतनी? हातपाय धोवलेश का? तुला गूळपाणी मिळालां नी? आमचे एठा चहाकाफ्याची सवय नाय बाबी कोणाला, नि आम्ही तो आणीतय नाहीं. थोडे पहू बिहू खाचश का? भुकायलो सशील. एतां जेव्वेला दखील लोकरच होएल. आज वळकट दिवस देवळा गेल्यां नतल्यां. आज सोमवारचां देवदर्शन घेवनी येवांसां वाटलां म्हणी गेल्यां. देवदर्शन घेतलां, ओळखी-देखीच्यो चार बायाको भेटल्यो, तेंचेजवळ अमळशी बोलत बेसल्यां, म्हणी दोनघटका उशीर झालो. पण पुणे मुंबईहारची बातमी समजली ; बरां झालां. खरां बघितलां तर देव म्हणचे देवळांत वरीक सचे, घरांत नाहीं, असां थोडांच से. तो जगाचो मायबाप जळीं, स्थळीं, काष्टीं, पाषाणीं, जकडा तकडा भरलेलोच से. पण, पुष्कळ माणसां एकदम एक जागे भेटेवीं, सगळेंच्यो ओळखी देखी होयव्यो, सगळेंची ख्याली खुशाली एकामेकांना समजेवी, कमजास्ती गरजो कळेव्यो, आपलेपण वाढत जायवां, कांहीं गोष्टी सगळेंच्या जुटीन ह्लयवेच्यो सचत तेंचो विचार करेवो, म्हणचे थोडकेंत सांगों का? गावांत एक शिस्तीची जूट होयवी, म्हणी एक जागा; नि भावना बेसणे सारखी ती पवित्र, अशी कोणा भाग्यपुरूशान ती ठरवनी ठेयलीन; नि सगळेंच्यो वरचेवर एकदम भेटी होणेसाठीं वेगवेगळे पुष्कळ उत्सव केलेन. अशो कितीतरी पुष्कळ चांगल्यो रीती नि शिस्ती आपले वाडवडलांन् पाडलेल्यो नि चालत आयलेल्यो सत. पण तेंचो बरोवाईटपणा कळचे से कोणाला नि ते प्रमाण वागचे से कोण? मे मुंबईपुणेसारखे मोठे शहरांत गेल्यां वावरल्यां नाहीं; पण केडला केडला आयकों येचे, नि मुंबई हारठीं आयलेलीं लाहान मोठीं बरींच माणसां आढळचत, नि घरांत दखील केडला तरी बोलणीं होचत, तेवरठीं आपले चांगले रीतरिवाज अगदीं सुटत चालले सां दिसों लागलां, हें बरेचां चिन्ह नाहीं. दिवसान्‌दिवस भलभलत्यो परी नि चोचले वाढत चालले; ते मुळां दुनिया भिका लागली. कितां ते बूट, पाटवणी का पाटलणी, आंगांतलीं आंगढीं तरी किती परचीं नि एकावर एक, नि तेंना पाठींपोटावर बंद किती, गळेंत लोंबत्यो चिंध्यो कितां, डोयावर केसांचीं झिपतरांनि शिपतरां कितां, एक नि दोन, कांयेक ताळतंत्र रेहेलो नाहीं. रोज सकाळीं उठलेबरोबर आदी पोरांबाळांसकट चाहा नि भिस्कुटां हवीं; ते शिवाय म्हणे परसाकडाच होत नाहीं. कसल्यो घाणेरड्यो ह्यो सवई !! रागां भरों नाकां. बरेवाईटाचो विचार करणारो तूं सश, नि नावडते बोलणारे माणसाला हेंगडायवेचो नाहीं, म्हणी तुझेजवळ बरे वाईट दोन शब्द बोलेवेसे वाटचत. तरी

दखील माला वाटचे तां मे अगदीं थोडकेंत सांगचां.

पहिलेन बुटाचीच गोष्ट बघीश नाय्. आपले पाईची ठेवण कशी से? पावलाचे बोटांहारचो भाग सगळेंत रुंद, नि तेचे उलट बुटाचो तकडाचो भाग अरुंद, मग बुटांत पाऊल घातलेवर चवंडो आवळेल का नाहीं? नि तेला रग लागेल का नाहीं? बरोच वेळ झालेवर पावलां उवतील का नाहीं? आंगाला इजा होणां चखोट का? घालेवे काढेवे तरी किती वेळ लागचे? वरां इतकां सोनी मोल तरी थोडां का? दुप्पट तिप्पट पैको वेंचेवेचो नि तो सगळो परावे लोकांचे हातांत जायवेचो. पण आपले हारच्यो वाहाणो बघ, सगळे हारठीं सोय.

तीच गत पाटलणीचीं. आदी ती जाडे कापडाची सेवेचीं. वेसतां उठतां कोण श्रास! हें मे आज देवळांत दोघां तिघां पुरशांचां आपले डोळेंत्र् बघितलां. मुंबईहारठीं हे थेर आयले. आपलीं धोतरां, पंचे किती बरां सुटसुटीत!.

डोयावर म्हणचत शिपतरासारख्यो टोप्यो घालचत. ह्यो सगळ्यो पराव्यो चाली. असां अणखी कितीतरी सांगणेंसारखां से.

बाबा रे देश तसो वेश, अशी म्हण से. आपले हारची हवा फारशी थंडय् पण नाहीं, नि वळकट उष्णय् पण नाहीं, तेसारखो धोतरां, पंचे, बंड्यो असलोच पोशाक चखोट; नि तेणीनच देहाला सुख होएल.

माणसान घे म्हटले आपलेपण सोडूं नये. दुसरेचां चखोट सेल तां घेवां. पण उठले सुटले दुसरेच्यो सगळयोच तऱ्हा घेणां अगदीं वाईट. खाणां, पिणां, पोशाक, बोली, आचार विचार, धर्म, हें जेचां तेणीन सोडतां कामा नये. तेंत आपलेपणाचो अभिमानच हवो. आतांशा पुरुश, बायाको, धाकटीं, बघेवीं तीं अगदींच आपलीं शिळपट दिसचत. तरणेताठे बांड पुरशांना पाहिले म्हातारेंचां अवसान नि रग नाहीं. मे अजुनी दोन दोन तीन तीन कुडवांचे मटू कांडूं लागल्यां तर मुसळ खाल ठेयणार नाहीं. नि एतांच्यो तरण्यो बायाको दोन पायल्यांचां भाताचां तपलां उतरंतांना हासामूस होचत. असां की होऊं लागलां हेचो कोणच विचार करीत नाहीं. दिवसान् दिवस सगळ्याच गोष्टींत्र् भिकारपण नि दुबळेपण वाढत चाललां. हेचो सगळेंत्र् विचार करनी आपलां हित-साधन करेवे हवां. नि हें साधेवे तुमचसारखे शिकले सवरलेले नि तरणे लोकांत्र् मनापाशीं बटेवे हवां. परे एतां. देव तुझां भलां करू.

## चित्पावनी भाषांतलीं पदां.

### पद १ लां.

कृष्ण तुझो धटकी। बायो कृष्ण तुझो धटकी ॥ ध्रु० ॥
गोवां राखचे दिसचें मोठो। म्हणचे तुम्हि बटकी ॥ बायो० १ ॥
चालचे दुडदुड बोलचे फडफड। नाचचे जसो नटकी ॥ बायो० २ ॥
मोठो होचे लाहान होचे। बोड्यो तुझो चटकी ॥ बायो० ३ ॥

म्हणचे गायचीं प्रभुगुणगाणीं । वाजयनी चिटकी ॥ बायो ० ४ ॥
साधुसज्जनां पोशिन म्हणचे । मारिन खळ झटकी ॥ बायो ० ५ ॥
आत्मारामीं प्रेमकृपाघन । दि[illegible]निशीं हटकी ॥ बायो ० ६ ॥

पद २ रां.

वेणू वाजयचे । देहुडा वेणू वाजयचे ॥ ध्रु० प० ॥
देवभावना सर्वांभूतीं । तेला हो कळचे ॥ देहुडा० १ ॥
भाविक भोळे दृढविश्वासी । तेंना हो फळचे ॥ देहुडा० २ ॥
योगतपांहीं नच उमगे जो । तो भजनान् मिळचे ॥ देहुडा० ३ ॥
आत्मारामा देत विसावो । यम दुर्धर पळचे ॥ देहुडा ०. ४ ॥

पद ३ रां.

एतां कितां करूं बायो, एतां कितां करूं ।
बांधों जाचां पळों लागचे कसो हेला धरूं ॥ ध्रु० प० ॥
यशोदाबाई सांगों आयल्यां गोविंदाच्यो खोड्यो ।
दिसचे गरीब मेंगळतोंड्यो, लाडको तुझो बोड्यो ॥ एतां कितां करूं ध्रु० १ ॥
हळूच येवनी डेरेंत बघचे खाचे सगळां लोणी ।
थेंब नाहीं दुभतेचो ग्ये, फोडनी टाकचे दुधाणीं ॥ एतां कितां करूं० ॥ २ ॥
घातलां जरी उन्हवणी, येत नाहीं लोणी ।
ताक सगळां नायसां होचे, दिसचे शुद्ध पाणी ॥ एतां कितां करूं० ॥ ३ ॥
गाई सोडनी, तेंच्या जागां, बईल सगळे बांधचे ।
धार काढेवेला जाऊ तों माझी फसगत होचे ॥ एतां कितां करूं० ॥ ४ ॥
निजल्यो पोरी लोणी फांसचे तेंचे तोंडावरतां ।
गावांत थारो उरलो नाहीं, हंसचे बोभाट करतां ॥ एतां कितां करूं० ॥ ५ ॥
सुप्रभातीं उठा म्हणचे करा विणीफणी ।
बायाकांचे धर्म पाळा, घाला तुळशी पाणी ॥ एतां कितां करूं ॥ ६ ॥
परावे घरा जाऊं नये गोष्टी सांगेवेला ॥
धर्मनीतिच्यो गोष्टी सांगचे, कितां करूं हेला ॥ एतां कितां करूं ॥ ७ ॥
आत्मारामीं रेहेचे उभो हृदयमाजघरीं ।
बघतां हरलां मीतूंपण हें । सुटली जन्मवारी ॥ एतां कितां करूं० ॥ ८ ॥

---

# अस्सल चित्पावनी भाषा.

## व्याकरणविषयक सामान्य विचार.

(लेखक :—कृष्णाजी गोविंद साठे, पेन्शनर हेडमास्तर, गोठणें देवाचें, जि. रत्नागिरी).

मराठी ग्रंथभाषेहून चित्पावनी भाषेच्या भिन्न घटनेपुरता विचार येथें केला आहे; बाकी सर्व नियम ग्रंथभाषेप्रमाणेंच बहुधा आहेत. चित्पावनी भाषा रत्नागिरी जिल्ह्यांतील रत्नागिरी तालुक्याच्या उत्तरसीमेपासून—म्हणजे जयगडखाडीच्या दक्षिणतीरापासून—दक्षिणेकडे समुद्रालगतच्या चिंचोळ्या प्रदेशांत तहत वेंगुर्लें, सावंतवाडी, गोमांतक—आणि कदाचित् ह्याच्याहि पलीकडे फार लांबपर्यंत—चित्पावन ब्राह्मणांची खास भाषा ह्मणजे आपसांत बोलण्याची भाषा आहे. अलीकडे मुंबई वगैरे इतर प्रांतीं बायकामुलांसह जाण्यायेण्याचें वगैरे दळणवळण वाढल्यापासून शहरांतून व क्वचित् खेडेगांवांतूनहि चित्पावनी भाषा बहिष्कृत होऊं लागली आहे. ह्याचें कारण बहुधा ही भाषा हीन प्रतीची असून ती बोलल्यानें आपण अडाणी वर्गांत लेखले जाऊं अशी लोकांची समजूत असावी, असें वाटतें. कदाचित् आचारविचार, पोशाखपेहराव, वगैरे आपल्या बहुतेक रूढ गोष्टींविषयीं—विशेषतः ब्राह्मणवर्गामध्यें—अनादर व परानुकरणाची हाव बळावत चालल्याचाहि हा परिणाम असें ह्मटलें तरी वावगें होणार नाहीं. परंतु स्वत्वाविषयीं अनास्था किंवा अभिमानशून्यता आणि परानुकरणाची लालसा हीं सूज्ञमतीं दूषणयिच होत. ह्या भाषेची घटना भाषासंशोधकांच्या कसोटीवर घासून निघाल्यास कदाचित्—चित्पावन ब्राह्मणवर्गाची वसाहत कोणीकडून कशी प्रसृत होत गेली वगैरे—मोठ्या तत्त्वावर प्रकाश पडण्याचा संभव आहे; आणि त्यामुळें ही भाषा हिणकस नसून—बहुमोल नसली तरी—आदरणीय असल्याचाहि अभिप्राय मिळूं शकेल, असें अनुमान आहे. असो.

(महाराष्ट्रग्रंथभाषेशीं चित्पावनी भाषेची तुलना पाहतां भिन्नता दिसते ती :—)

### व्याकरण—विशेष.

स्वरांपैकीं ए आणि ओ ह्यांचा उच्चार कांहींसा आडवा म्हणजे एचा अ, ए ह्यांच्यामध्यें (इंग्रजी an, cat, ह्या शब्दांतील स्वरोच्चाराजवळजवळ) आणि ओचा अ, ओ ह्यांच्यामध्यें ( इंग्रजी on, ox, not,, ह्या शब्दांतील स्वरोच्चाराजवळजवळ ) होतो.

ह्या उच्चारासंबंधानें एका शोधक विद्वद्वर्याचा अभिप्राय :—

"ए ओङ् सूत्रे महाभाष्ये

ननु च मोश्छंदोगानां सात्यमुग्रिराणायनीया अर्धमेकारमर्धमोकारं चाधीयते– सुजाते ए अश्वसूनृते अध्वर्यो ओ अद्रिभिः सुतं, शुक्रं ते ए अन्यत्, यजतं ते ए अन्यत्–इति.

पार्षदकृतिरेषा तत्रभवताम् । नैव हि लोके नान्यस्मिन् वेदे अर्ध एकारोऽर्ध ओकारो वास्ति ॥

सामवेद्यांतील सात्यमुग्रिराणायनीय शाखेचे लोक सामगायन करितांना ए अथवा ओ च्या पुढील अचा लोप करीत नाहींत किंवा प्रकृतिभावहि करीत नाहींत.

'प्रकृत्यान्तःपादमव्यपरे' पा. अ. ६।१।११५

ह्या सूत्रानें अचा लोप न होतां प्रकृतिभाव प्राप्त असतां हे सात्यमुग्रिराणायनीय शाखेंचे लोक गायनपद्धतीला अनुरूप असा एकार किंवा ओकार अच्या स्थानीं करितात. आणि हा अर्ध एकार व अर्ध ओकार सांप्रत कानडी, तामिल, तेलगू आणि मल्याळ या चार भारतीय भाषांत आहे."

## शब्दस्वरूप.

१ नात्याचे वाचक शब्द शकारान्त असतात. जसें:–आईश, बापूश, भाऊश, बेहणीश, चुलतूश, चुलतीश, आतश, घोऊश, ससरूश, सासूश, देरूश, जाऊश, नंदश, सुन्हश.

२ (अ)–महाराष्ट्रग्रंथभाषेंतील आकारान्त शब्द चित्पावनी भाषेंत ओकारान्त असतात. जसें–घोडो, भोपळो, चौथरो; पायल्यो, चिंघ्यो, पोथ्यो; लाडको, शाह्यणो; त्यो, ह्यो, ज्यो, हो; निघालो, आयलो, बोलल्यो, हवो (क्रियाप०), ठेयलो, इ०

(ई) एंकारान्त शब्द आंकारान्त आहेत. जसें–केळं, सोनां, भांडां, फुलां, गवतां, तां, जां, पांढरां, तांबडां, बकरां, उभां, आडवां.

गेल्यां, म्हटलां, हवां, बोलल्यां, आइकलां, फुटलां इ०

(ऊ) वकारान्त धातु यकारान्त; आणि प्रयोजकभेदीं व प्रत्ययाच्या स्थानीं य प्रत्यय–जसें– जेय, ठेय,

करय, फिरयलो, सोपयचे, चालयली, घेवयलां; इ.

अपवाद–चाव धातूच्या व स्थानीं य होत नाहीं.

## सामान्यरूप.

चित्पावनी भाषेंतील शब्दघटनेप्रमाणें–एकवचनी सामान्यरूपाचे प्रकार :–

१ अकारान्त, (अ) पुन्नपुंसक शब्दांचीं आकारान्त. जसें:–

देव-देवा, माणूस-माणसा, पाट-पाटा, चित्र-चित्रा,

(आ)अकारान्त व इकारान्त स्त्रीलिं. (१) जीभ-जिभा, चिंच-चिंचा, वाट-वाटा;
(२) भिंत-भिंती, चेंड-चेंडीं, थाळ-थाळी;

२ आंकारान्त नपुंसक शब्दांची एकारान्त. जसें :–
तळां-तळें, केळां-केळे, लोणचां-लोणचे, फुरसां-फुरसें.

३ ईकारान्त स्त्रीलिंगी व नपुंसक शब्दांचीं याकारान्त. जसें :–
भिमी-भिम्या, खुटी-खुटया, पायली-पायल्या, घोडी-घोडया, हनवटी-हनवटया, बुगडी-बुगड्या, काठी-काठ्या, पाणी-पाण्या, लोणी-लोण्या; इ.

४ ऊंकारान्त नपुंसक शब्दांचीं आकारान्त. जसें –
लिंबूं-लिंबा, गोरूं-गोर्वा, वासरूं-वासरा-वासर्वा, काडूं-काडवा, तारूं-तारवा; इ.

५ ओंकारान्त–(अ) पुल्लिंगी शब्दांची एकारान्त. जसें :–
घोडो-घोडे, पाळणो-पाळणें, माचो-माचे, आंबो–आंबे, पाटो-पाटे, हो-हे, जो-जे- तो-ते, इ.

(आ) स्त्रीलिंगी आकारान्त-बायाको-बायाका,

अनेकवचनी सामान्यरूपें, एकवचनी सामान्यरूपांप्रमाणेंच; परंतु अन्त्यवर्ण सानुनासिक असतो.

## विभक्तिप्रत्यय

| | एकवचनी | | अनेकवचन. | |
|---|---|---|---|---|
| | प्रत्यय | प्रत्ययान्त शब्द | प्रत्यय | प्रत्ययान्त शब्द |
| प्रथमा | ० | फूल, करंद | आं | फुलां, करंदां |
| | | गाय, कोशिंबीर | ई | गाई, कोशिंबिरी. |
| | | केळां, पातेलां | ईं | केळीं, पातेलीं |
| | | घोडो, माचो | ए | घोडे, माचे |
| | | चिंच, वाहाण | ओ | चिंचो, वाहाणो |
| | | शेळी, छत्री, बी | यो | शेळ्यो, छत्र्यो, बियो |
| | | बीं | यां | बियां |
| द्वितीया } चतुर्थी } | ला | माला, हेला | ला | आमला, तुमला |
| | | गाईला, विठूला | ना | तेंना, हेंना, जेंना, देवांना, गाईंना, वासरांना, चिंच्यांना. |
| तृतीया | न | देवान, गड्यान | य | देवांय्-न्, गड्यांय्-न्, तेंय्-न्, |
| | णीन | तेणीन, हेणीन जेणीन | किंवा न् | हेंय्, जेंन्, फुलांन् |

## नमुन्यासाठीं कांहीं विभक्तियुक्त शब्द.

| विभक्ति | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्रथमा | देव | देव |
| द्वि.+च. | देवाला | देवांना |
| तृ० | देवान | देवांयू-ञ |
| मानितात* पंच० | देवापाष्टीं | देवांपाष्टीं |
| | देवापक्षां | देवांपक्षां |
| | देवाहारठीं | देवांहारठीं |
| षष्ठी | देवाचो(प्रसाद) | देवांचो (प्र.) |
| | देवाचो(उत्सव) | देवांचे (उ.) |
| | देवाची (भक्ति) | देवांची (भ.) |
| | देवाच्यो(गाई) | देवांच्यो(गा.) |
| | देवाचां(नांव) | देवांचां(ना.) |
| | देवाचीं(वस्त्रां) | देवांचीं (व.) |
| सप्तमी | देवांत | देवांत |

| विभक्ति | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | मामा | मामा |
| द्वि० च० | मामाला | मामांना |
| तृ० | मामान | मामांयू-ञ् |
| | मामानश | मामाशींयू—ञ् |
| पं० | मामापाष्टीं | मामांपाष्टीं |
| | मामापक्षां | — पक्षां |
| | मामाहारठीं | — हारठीं |
| ष० | मामाचो (लोभ) | —चो(लोभ) |
| | मामाचे (मळे) | —चे (म०) |
| | मामाची (शेती) | —ची (शे०) |
| | मामाच्यो (म्हशी) | —च्यो(म्ह०) |
| | मामाचां (सोवळां) | —चां (सो०) |
| | मामाचीं (झाडां) | —चीं (झा०) |
| स० | मामांत | मामांत |

| विभक्ति | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | कोयती | कोयत्यो |
| द्वि० च० | कोयत्याला | कोयत्यांना |
| तृ० | कोयत्यान | कोयत्यांञ्-यू |

| विभक्ति | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | चाकू | चाकू |
| द्वि० च० | चाकवाला | चाकवांना |
| तृ० | चाकवान | चाकवांञ्-यू |
| पं० | चाकवापक्षां | —वांपक्षां |
| | —पाष्टीं | —पाष्टीं |
| | —हारठीं | —हारठीं |
| ष० | चाकवाचो | चाकवांचो |
| | —चे | —चे |
| | —ची | —ची |
| | —च्यो | —च्यो |
| | वगैरे | वगैरे |

* महाराष्ट्रभाषापंडितांपैकीं कित्येक पंडित व वैय्याकरण पंचमी आणि षष्ठी ह्या विभक्ति मानीत नाहींत. कारण पंचमीचे प्रत्यय नसून सामान्यरूपापुढें पासून वगैरे कांहीं शब्दयोगी अव्ययें योजिलीं जातात. आणि षष्ठीचे म्हणून (कित्येक पंडित व वैय्याकरण) जे प्रत्यय मानितात ते इतर विभक्तिप्रत्ययांप्रमाणें नसून तद्युक्त शब्द विशेषणासारखे ठरतात म्हणजे संबंधी शब्दाच्या लिंगवचनानुरूप मूळ शब्दाच्या सामान्यरूपापुढें प्रत्यय योजिले जातात; मूळ शब्दाच्या लिंगवचनानुरूप प्रत्यय योजीत नाहींत. म्हणून ह्या कारक विभक्ति नव्हत.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० } तृ० } | मे | आम्ही |
| द्वि० } च० } | माला | आमला |
| पं० | माझेपार्ष्टीं | आमचेपार्ष्टीं |
| | माझे पक्षां | आमचे पक्षां |
| | —हारठीं | —हारठीं |
| ष० | माझो (गडी) | आमचो (गडी) |
| | माझे (हात) | आमचे (हा०) |
| | माझी (चेड) | आमची (चे०) |
| | माझ्यो (आंगट्यो) | आमच्यो (आं०) |
| | माझां (कूळ) | आमचां (कू०) |
| | माझीं (फुलां) | आमचीं (फु०) |
| स० | माझेंत | आमचेंत |

(पं० ते ष० : मानिल्यास)

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | जो | जे |
| द्वि० } च० } | जेला | जेंना |
| तृ. | जेणीन | जेंय्—न् |
| पं. | जेपार्ष्टीं | जेंपार्ष्टीं |
| | जेपक्षां | जेंपक्षां |
| | जेहारठीं | जेंहारठीं |
| ष. | जेचो (घोडो) | जेंचो (घोडो) |
| | जेचे (पैसे) | जेंचे (पैसे) |
| | जेची (वांटणी) | जेंची (वांटणी) |
| | जेच्यो (चिटयो) | जेंच्यो (चिटयो) |
| | जेचां (जनावर) | जेंचां (जनावर) |
| | जेचीं (पुस्तकां) | जेंचीं (पुस्तकां) |
| स. | जेंत | जेंत |

| | | |
|---|---|---|
| प्र. | बापूश | बापूश |
| द्वि. } | बापसाला | बापसांना |
| च. } | बापालाश | बापांनाश |
| तृ. | बापसान | बापसांय् |
| | बापानश | ० |
| पं. | बापसापार्ष्टीं | बापसांपार्ष्टीं |
| | बापाशपार्ष्टीं | बापांशपार्ष्टीं |
| | बापसापक्षां | बापसांपक्षां |
| | बापाशपक्षां | बापांशपक्षां |
| | बापसाहारठीं | बापसांहारठीं |
| | बापाशहारठीं | बापांशहारठीं |
| ष. | बापसाचो | बापसांचो |
| | बापाचोश | बापांचोश |
| | बापसाचे | बापसांचे |
| | बापाचेश | बापांचेश, वगैरे. |

| | | |
|---|---|---|
| प्र. | आईश | आयशी |
| द्वि. } | आयशीला | आयशींना |
| च. } | आयालाश | आयांनाश |
| तृ. | आयशीन | आयशींय् |
| | आयानश | ० |
| पं. | आयशीपार्ष्टीं | आयशींपार्ष्टीं |
| | आयाशपार्ष्टीं | |
| | (बाकी बापाप्रमाणें) | |
| ष. | आयशीचो | आयशींचो |
| | आयाचोश | ० |
| | आयशीचे | आयशींचे |
| | आयाचेश | ० |
| | आयशीची | आयशींची |
| | आयाचीश | ० |
| | आयशीच्यो | आयशींच्यो |
| | आयाच्योश | ० |
| | आयशींचां | आयशींचां |

| | ए. व. | अ. व. | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|---|---|
| प्र. | देरूश | देरूश | प्र. | सासूश | सास्वशी |
| द्वि. च. | देरालाश | देरांनाश | द्वि. च. | सास्वालाश | सास्वशींना |
| तृ. | देरानश | देराशांय् | तृ. | सास्वानश | सास्वशींय्-स् |
| प्र. | आजोश | आजेश | प्र. | आतश | आतशी |
| द्वि. च. | आजेलाश | आजेंनाश | द्वि. च. | आतालाश | आतशींना |
| तृ. | आजेनश | आजेशींय् | तृ. | आतानश | आतशींय्-स् |
| प्र. | जाऊश | जावशी | | | |
| द्वि. च. | जावालाश | जावांनाश | | | |
| तृ. | जावशीन | जावशींय् | | | |

## क्रियापदविचार

### ( कालप्रधान ) प्रत्यय

**वर्तमान**

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० पु० | आं | ओं |
| द्वि० पु० | श | आ |
| तृ० पु० | ए | त |

हे प्रत्यय फक्त अस् धातूचे आहेत. ह्या अस धातूच्या पूर्व स्वराचा लोप होऊन स्वरात्मक प्रत्यय पररूपसंधीनें युक्त होतात.

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० | चां | चों |
| द्वि० पु. | च श | चा |
| तृ. पु. | चे | चत |

हे प्रत्यय अस धातूला पूर्वस्वराचा लोप होऊन रीतिवर्तमानकाळीं आणि इतर सर्व धातूंना वर्तमान-काळीं युक्त होतात. इतर धातूंचीं रीतिवर्तमानीं रूपें, त्या धातूंना त, किंवा इत, प्रत्यय लागून त्यापुढें (अ) स धातूचीं रीतिवर्तमानी रूपें योजून बनतात.

| भू. का. कर्तरि | | | | भूत-कर्मणि | |
|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | (पुल्लिं.) | लों लों | प्र. | (पु.) लो | ले |
| | ( स्त्री ) | ल्यां ” | | (स्त्री.) ली | ल्यो |
| | ( न. ) | लों ” | | (न.) लां | लीं |
| द्वि. पु. | ( पु. ) | लोश लेत | द्वि. | (पु.) लोत, लेत | लोश, लेश |
| | ( स्त्री. ) | लीश ल्योत | | (स्त्री.) लीत, ल्योत | लीश, ल्योश |
| | ( न. ) | लांश लींत | | (न.) लांत, लींत | लांश, लींश |

ह्यांत फक्त प्रथन-पुरुषीं कर्ता असतां मात्र कर्माच्या लिंगवच-नानुरूप क्रियापदरूपें बनतात. पण इतर पुरुषीं कर्ता असतां

| | | | |
|---|---|---|---|
| तृ. पु.(पु.) | लो | ले | तृ. (पु.) लोन, लेन — लीं |
| (स्त्री.) | ली | ल्यो | (स्त्री.) लीन, ल्योन — लीं |
| (न.) | लां | लीं | (न.) लान, लीन — लीं |

कर्ता व कर्म ह्यांच्या अनुरोधानें प्रत्यय लागून क्रियापदें बनतात.

भविष्य

| | | |
|---|---|---|
| प्र. | ईन, एन | ऊं |
| द्वि. | शील | आल |
| तृ. | ईल, एल | तील |

## क्रियापदरूपें (अ)स धातु

| | वर्तमान ए. | वर्तमान अ. | रीतिवर्तमान ए. | रीतिवर्तमान अ. |
|---|---|---|---|---|
| प्र. | सां | सों | सचां | सचों |
| द्वि. | सश | सा | सचश | सचा |
| तृ. | से | सत | सचे | सचत |

भूत

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| प्र. | (पु.) | सलें | सलों |
| | (स्त्री.) | सल्यां | ,, |
| | (न.) | सलें | ,, |
| द्वि. | (पु.) | सलोश | सलेत |
| | (स्त्री.) | सलीश | सल्योत |
| | (न.) | सलांश | सलींत |
| तृ. | (पु.) | सलो | सले |
| | (स्त्री.) | सली | सल्यो |
| | (न.) | सलां | सलीं |

भविष्य

| | | |
|---|---|---|
| प्र. | सन | सों. सऊं |
| द्वि. | सशील | साल |
| तृ. | सेल | सतील |

## जा धातु

वर्तमान

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | जाचां | जाचों |
| द्वि. | जाचश | जाचा |
| तृ. | जाचे | जाचत |

भविष्य

| | | |
|---|---|---|
| प्र. | जाएन | जाऊं |
| द्वि. | जाशील | जाल |
| तृ. | जाएल | जातील |

भूत

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | (पु.) | गेलें | गेलों |
| | (स्त्री.) | गेल्यां | ,, |
| | (न.) | गेलें | ,, |
| द्वि. | (पु.) | गेलोश | गेलेत |
| | (स्त्री.) | गेलीश | गेल्योत |
| | (न.) | गेलांश | गेलींत |
| तृ. | (पु.) | गेलो | गेले |
| | (स्त्री.) | गेली | गेल्यो |
| | (न.) | गेलां | गेलीं |

## हो

ह्या धातूला फक्त भूत-काळीं होच्याबद्दल झा आदेश होतो याशिवाय फरक नाहीं.

## ये धातु

**वर्तमान**

| | | |
|---|---|---|
| प्र. | येचां | येचों |
| द्वि. | येचश | येचा |
| तृ. | येचे | येचत |

**भविष्य**

| | | |
|---|---|---|
| प्र. | येन | येऊं |
| द्वि. | येशील | याल |
| तृ. | येल | येतील |

**भूत**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | (पु.) | आयलों | आयलों |
| | (स्त्री.) | ,, ल्यां | ,, |
| | (न.) | ,, लों | ,, |
| द्वि. | (पु.) | आयलोश | आयलेत |
| | (स्त्री.) | ,, लीश | ,, ल्योत |
| | (न.) | ,, लांश | ,, लींत |
| तृ. | (पु.) | ,, लो | ,, ले |
| | (स्त्री.) | ,, ली | ,, ल्यो |
| | (न.) | ,, लां | ,, लीं |

## धर धातु

**वर्तमान**

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | धरचां | धरचों |
| द्वि. | धरचश | धरचा |
| तृ. | धरचे | धरचत |

**रीतिवर्तमान**

| | ए. व. | अ. ए. |
|---|---|---|
| प्र. | धरीतसचां | धरीतसचों |
| द्वि. | धरीतसचश | धरीतसचां |
| तृ. | धरीतसचे | धरीतसचत |

**भविष्य**

| | ए. ए. | अ. ब. |
|---|---|---|
| प्र. | धरीन | धरूं |
| द्वि. | धरशील | धराल |
| तृ. | धरील | धरतील |

**भूत (कर्मणि)**

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | (मे पोपट) धरलो | (मे वांसे) धरले |
| | (आम्ही ") " | (आम्ही ") " |
| | (मे चिमणी)धरली | (मे चिमण्यो)धरल्यो |
| | (आम्ही" ) " | (आम्ही ") " |
| | (मे पाखरूं) धरलां | (मे पाखरां) धरलीं |
| | (आम्ही" ) धरलां | (आम्ही ") धरलीं |
| द्वि. | (तूं पोपट) धरलोश | (तूं वांसे) धरलेश |
| | (तुम्ही " ) धरलोत | (तु " ) धरलेत |
| | (तूं चिमणी)धरलीश | (तूं चिमण्यो)धरल्योश |
| | (तुम्ही" ) धरलीत | (तुम्ही " )धरल्योत |
| | (तूं पाखरूं)धरलांश | (तूं पाखरां)धरलींश |
| | (तुम्ही पाखरूं)धरलांत | (तुम्ही पाखरां) धरलींत |
| | (तेणीन पाखरूं) धरलान | (तेणीन पाखरां) धरलीन |
| | (तेंयू " ) धरलीं | (तेंयू पाखरां)धरलीं |

रीतिभूतकाळीं धरीत ह्या वर्तमानकालवाचक अव्ययापुढें [अ]स धातूचीं भूत काळीं रूपें युक्त होतात. ह्याचप्रमाणें वर्तमानभूत, भविष्यभूत वगैरे इतर संयुक्तकाळींहि ग्रंथभाषेच्या नियमाप्रमाणें ह्या भाषेच्या पद्धतीला अनुसरून रूपें बनतात.

## अर्थप्रधान क्रियापदें

| | आज्ञार्थ | | विध्यर्थ | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. पु. | ऊं, ओं | ऊं | वां | वां |
| द्वि. पु. | ० | आ | वांश | वांत |
| तृ. पु. | ऊंदे, ओनदे | उंदत, ओनदत | वां, एवां | वीं |

स्वरादि प्रत्यय सर्वत्र पररूपसंधीनें युक्त होतात.

विध्यर्थी जा धातूला य आगम होऊन त्यापुढें प्रत्यय योजितात. जसें मे जायवां, तूं जायवांश इ०

### ये धातु

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | (मे) येऊं | (आम्ही) येऊं | (मे) येवां | (आम्ही) येवां |
| द्वि. पु. | (तूं) ये | (तुम्ही) या | (तूं) येवांश | (तुम्ही) येवांत |
| तृ. पु. | (तो) (ती) (तां) येऊंदे | (ते) (त्यो) (तीं) येऊंदत | (तेणीन) (त्याणीन) (तेणीन) येवां | (तेंय्) (त्यांय्) (तेंय्) येवीं |

विध्यर्थाचा आणखी एक प्रकार; त्याचें प्रत्यय हे कर्तरि आहेत जसें:—

| ए. व. | अ. व. | | |
|---|---|---|---|
| एवेचो | एवेचे | (मे) करेवेचो | करेवेचे |
| एवेचोश | ,, | (तूं) करेवेचोश | ,, |
| एवेचो | ,, | (तो) करेवेचो | ,, |
| —ची | एवेच्यो | (ती) —ची | —च्यो |
| —चां | —चीं | (तां) —चां | —चीं |

### म्हण–आज्ञार्थ

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | (मे) म्हणों | (आम्ही) म्हणूं | म्हणेवां | म्हणेवां |
| द्वि. पु. | (तूं) म्हण | (तुम्ही) म्हणा | म्हणेवांश | म्हणेवांत |
| तृ. पु. | (तो) (ती) (तां) म्हणोनदे | (ते) (त्यो) (ती) म्हणोनदत | म्हणेवां, म्हणावां | म्हणेवीं |

### धातुसाधितें

१ वर्तमानकालवाचक—प्रांथिकभाषेप्रमाणेंच.

२ पूर्वकालवाचक—धातूला नी प्रत्यय लागतो. मात्र एकाक्षरी धातूंना नी प्रत्ययापूर्वी व आगम होतो. जावनी, येवनी, खावनी, वेवनी, इ० करनी, बघनी, शिकनी, म्हणनी, वाचनी, ठेयनी, जेयनी, चावनी, इ०

३ निमित्तवाचक--धातूला ऊं, ओं हे प्रत्यय लागून बनतात. येऊं, जाऊं, करूं, शिकूं, शिकों, म्हणूं—म्हणों, बोलूं—बोलों, चालूं—चालों, इ०

## शब्दसंग्रह

फक्त चित्पावनी भाषेंतील विशेष शब्दांचा संग्रह येथें केला आहे.

| चित्पावनी शब्द | तदर्थक ग्रंथभाषेंतील पर्याय |
|---|---|
| असां | असें ( सर्वनाम ) |
| असो | असा " |
| अउर, अहूर | पूर (नदीचा) |
| आंगचा | गोवर (विकार) |
| आंगडा | आंगडें |
| आंदुळो | झोपाळा |
| इतलो | इतका |
| इतल्यो | इतक्या |
| इतलां | इतकें |
| उपलवट | उपव्द्याप, गडबड |
| एठा | एथें—येथें |
| एठाठीं | एथून—येथून |
| एतां | आतां |
| ओसरी | ओटी |
| ओळक | ओगराळ्याप्रमाणें परंतु मधल्या डेऱ्यापेक्षां तोंड आकुंचित असें नाराळाचें बेलें तयार करून त्याच्या तोंडाजवळच किंचित् खालीं दोहोंकडे समोरासमोर भोंकें पाडून त्यांत काठी लांब सुमारें हातभर बसवून केलेलें ओगराळ्यासारखें नारळी पात्र. हें, कढत पाणी भांडयांतून काढण्याकरितां असतें. |
| कय | कधीं |
| कसो | कसा |
| कसो | वंद (बंडी,अंगरख्याचा) |
| कशो | कशा |
| कसां | कसें |
| करेवे | करावयास |
| कडगुला | वांगडी |
| कितां | काय |
| किडला | कशाला |
| केडला | केव्हां |
| केरखंड | कोन [ घरांतील केर जमविण्याचा] |
| केहेठीं | कुठून |
| कें | कोठें |
| कोठिंबो | [ लाकडाचा दोणगा लांबट चौकोनी व सखल] |
| खळ | आंगण |
| खेड | फणसाच्या आठिळांची सुकी भाजी |
| गातां | माचा किंवा बाज ह्यांचीं बाजूचीं लाकडें |
| गोहोत | आंबोण [ गुरांचें खाणें विशेषत: दाणा, गुळी, कुंडा वगैरे शिजविलेलें] |
| घडशी | विटाळ झालेली किंवा विटाळशी |
| घडापड | विटाळ [कमी जातीचा स्पर्श ] |
| चखोट | चांगलें |
| चटोर | चावट |



अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| चिरगूट | वस्त्र [ विशेषतः बायकांचें ] |
| चेड | मुलगी |
| जसो | जसा |
| जसां | जसें |
| जशो | जशा |
| जाऊश | जाऊ |
| जावशी | जावा |
| जेडला | जेव्हां |
| जोडां, जोडपां, मेहूण | नवराबायको हें युग्म |
| जोवणां | वीज चमकणें |
| जां | जें |
| ज्याहां | जेथें |
| झोरो | कृशता |
| ठवणस | करार, [ येण्याजाण्याचा, कामाला लागण्याचा व० ] |
| ठावलां | भांडें |
| डगर | दरड |
| डगूळ | मोठा फणस |
| डवरो | खळगा |
| डाळी | हांतरी |
| ढाळ | जुलाब, रेच |
| तणवणां | तणवणें [ गवत सपाट पसरणें ] |
| तसो | तसा |
| तशो | तशा |
| तसां | तसें |
| तां | तें |
| तेंठीं | त्यांतून |
| तेडला | तेव्हां |
| त्याहां | तेथें |

| | |
|---|---|
| त्याहांठीं | तेथून |
| त्यो | त्या |
| थारळां | [ दूध तापविण्यासाठीं शेगडीसारखा जमिनींत केलेला खळगा ] |
| थार | जागा, थारा; आश्रय. |
| थाळ | पाणी तापविण्याची मोठी चूल |
| दूड | घागर व कळशी मिळून जोडी |
| देरूश | दीर |
| धाप | दमा |
| धुकट | धूर |
| नय | नदी |
| नई | नद्या |
| नंदश | नणंद |
| पारो | लहान व कोवळा फणस |
| पावठणी | पायरी |
| पावत | पर्यंत |
| पाशीं | पासून |
| पेगम | प्रयत्न |
| पिठलां | झुणका |
| पिढां | पाट [ बसण्याचा ] |
| पुतो | वरवंटा |
| पोंड | [पाणी साठवण्याचा खळगा विशेषतःपाटांत] |
| बळकट | पुष्कळ, फार |
| बोड्यो | मुलगा |
| बळद | खरकटे पदार्थ, खरकटीं भांडीं, सोवळे पदार्थ, वगैरे निराळे ठेवण्यासाठीं एकीकडे,भोवतालीं बांधोळी घालून केलेली राखीव जागा. |

| | |
|---|---|
| बाएल | बायको |
| बुडकुलो | मातीचें तांब्यासारखें तळाकडे रुंदट व तोंडाकडे आवळ असें भांडें |
| बोजार | आंब्याचें लोणचें |
| बोडसां | लाकडें तोडण्याजोगी मोठी कोयती |
| भाणस | मातीचें खालीं रुंद व वर अरुंद असें उभट भांडें |
| मागतेन | पुनः, फिरून |
| मागोतली | चुलीच्या मागची भिंतीपर्यंत–चुलीच्या उंचीइतकी सपाट जागा. |
| माध्यो | मोठी रवी [ताक घुसळण्याची] |
| माथान | माझ्याजवळ |
| मिरसांग | मिरची |
| मे | मी |
| मोघो | लोटा (पाण्याचा विशेषतः मातीचा) |
| मोरळी | विळी |
| रांधप | स्वयंपाक |
| वळचण | घराच्या बाहेरील भिंतीपासून पावळीपर्यंत जागा |
| वाढवण | केरसुणी |
| वांगड | सोबत |
| वांगडां | बरोबर, संगातीं |
| विरड | वेळ [दिवसाचें अर्ध] |
| विरड | कामाचीं लाकडें वगैरे साठविण्याचा माच |
| विणचां | संध्याकाळपैकीं सुमारें चारदोन घटका दिवस |
| शाक | भाजी |
| शेरणी | खिरापत [विशेषतः नारळाचे बारीक तुकडे] |
| सांगूळ | फणसाची भाजी–विशेषतः गरे, आठीळी व पातींसुद्धां अशी |
| सुघड | मातीचें तपेलीसारखें भांडें |
| सोर | मातीचें लहान तांबुलासारखें भांडें |
| हाड | आण |
| हाडचां | आणितों |
| हाडचे | आणितो–ते–तें |
| हाडेवे | आणावयास |
| हेंगडायणां | वेडावणें |
| होडांगो | अगडबंब [मोठा व स्थूल. निंद्य] |
| क्षानत किंवा शानत | अनिष्ट इजा, अनिष्ट-सूचक–दिशा पाडणें वगैरे–कृति |

पुरवणी

| | |
|---|---|
| घांटलां | तांदुळाच्या कण्या व नारळाचा रस ह्यांची घणसर खीर |
| घोऊश | नवरा |
| जर | ज्वर, ताप |
| पैको | पैसा [ह्या सामान्यार्थी पैसा ह्या नाण्याचा वाचक नव्हे.] |
| परावो | परका |
| हुडहुडी | कंपयुक्त थंडी अंगांत भरते ती |
| कडूठीं | कडून |
| तणावलो | [भू. का. पु. तृ. पु. ए. व क्रि. निंद्य–अन्यवस्थित–निजला. |

# गोमांतकीय कोंकणी भाषा.

(लेखक :–नारायण भा. नाईक, संपादक 'भारतमित्र,' रिवण–गोवा)

रत्नागिरी जिल्हा, सावंतवाडी संस्थान, गोमांतक, कारवार जिल्हा असे भाग मिळून बनलेल्या कोंकणप्रांतांत लोकांची बोलण्याची जी भाषा आज प्रचारांत आहे तीच कोंकणी भाषा होय. या भाषेला अजून पद्धतशीर स्वरूप देण्याचे प्रयत्न न झाल्यानें व तींत उच्च दर्जाचें वाङ्मयहि निर्माण न झाल्यानें आजला ही भाषा पुष्कळांना अपरिचित आहे. जर कधीं काळीं या भाषेला पद्धतशीर स्वरूप येईल व तींत उच्च दर्जाचें वाङ्मय जर झळकूं लागेल तर सबंध कोंकण प्रांताची ही मातृभाषा परिचित करून घेण्याबद्दल पुष्कळांचे प्रयत्न होतील यांत शंका नाहीं.

सबंध कोंकणप्रांताची मातृभाषा (तूर्त-हिचा उपयोग नुसता बोलण्याकडेच होत आहे) जरी कोंकणी असली, तरी ती सगळ्या भागांतून एकाच प्रकारानें बोलली जात नसून रत्नागिरी जिल्हा, सावंतवाडी संस्थान, गोव्यांतील पेडणें, डिचोली या भागांत एका प्रकारची तर गोव्यांतील-काणकोण, कारवार जिल्हा या भागांत दुसऱ्या प्रकारची व गोव्याच्या मध्यभागांत तिसऱ्या प्रकारची अशा किंचित् किंचित् फरकानें ती बोलली जाते. गोव्याच्या मध्यभागांत जी भाषा बोलली जाते तिला 'गोमांतकीय कोंकणी' म्हणण्यास हरकत नाहीं. या गोमांतकीय कोंकणी भाषेचाच एक नमुना दाखवावा या इराद्यानें जुगाराचे दुष्परिणाम दाखवलेली एक कथा त्याच भाषेंत खालीं देत आहों.

## "सांडलां थंयं सोदतोलों"

घटकाभर माजर नुस्तें सोडीत. भिकू त्रिबुनालार झळकनास्तना रावत. एखादो फट शेणै पीनास्तना रावत; पोण्ण सांग्यावैल्या काल्याच्या म्हुर्तान १९२० त हांव जो खेळूं लागलों, तो आतां केन्नाच हांव खेष्ठ सोडींसारखो ना. म्हजो हो हट्ट पोळौनच म्हजे संवगडी म्हाका म्हणतात, 'शाबास, दाम शेणै.'' १९१९ त हांव फुकटीच वकय खेळूं शिकलों. तेन्ना म्हजो बापूय आशिल्लो. ताका कोणें सांगलें कीं, हांव बोरो खेळणा म्होण्ण. एक दीस जेवतनां म्हजे बापायन म्हाका सांगलें, 'पोरा, खेळटा जाल्यार सारको पोण्ण खेळ रे! म्हजो बाप्पा कित्ले म्हजे मायेचो! अशें तेदेवेळा म्हाका दिसलें. म्हजो बाप्पा आतां जर आस्ता तर हांव पाशांनीं खेळटा तें पोळौन कित्लो खुशाल जाल्लो आशिल्लो! पोण्ण, त्या माया दया नाशिल्या काळान पोरान ताका व्हेलो! म्हजें पाशांच्या खेळाचें वैभव म्हजो बाप्पा पळैतलो आशिल्लो! तें पोराक काळाक

सोंसलें ना! आमच्या वडलांचें वर्साचें हजाराचें रेंद. म्हजो बाप्पा वाडवलो तेन्ना साकून तें हांव तशेंच घेई.

वक्रयेचो खेळ शिकतनीच कोट, तीनशेंचार, बुन्ह वीन्ह हें सगळें म्हजें शिकप जालें. एकदीस फट शेणै आयलो आनी ताणे म्हाका एकी दुकी शिकैली. त्या खेळांक म्हाका पैल्याच दिसा १०रु. मेळले. ते दीस म्हाका इतलो आनंद जालो कॉप मारतरीच जसो जुवांवांक जाता तसो. फुडे दस्ते, पेदीद, करतां करतां पाशे अशे खेळ हांव शिकून तातूंक तरबेज जालों. हें सगळें एकाच वर्सांत आं!

आमच्या गांवचे कांय खेळगडी सगळया जात्रांच्यो वारी करतात. जशे पळै पंढरेचे वारकारी नेमान जात्रेच्या दिसांत पंढरेक वतात तशेच हे लोक चुकनास्तना गोंयच्यो सोगळयो जात्रा, काले, शिगमे फिरतात. तो दीस १९२० त्लो. सांग्यावेल्या काल्याक तांचे वरोवर हांवय गेलों. थैंय २०–२५ रुपया म्हाका मेळ्ळे. अशे २।३ आक्तांक पैशे मेळटकीच लोक म्होणूं लागले "खेळान हाका वेंग मारली." खेळ हाजेकडेन उल्हौंक लागलो मरे!" हें आयकून म्हाका मुठभर मांस चडलें.

...अशा तरेन सगळया आक्तांक, खंय जात्रेक, खंय काल्याक, खंय सप्तेक, खंय लग्नाक, खंय मुंजीक असो हांव फिरूं लागलों. खंय मेळचे खंय वचचें अशें चल्लां.

पेलेवर्स हांव कोटंबीच्या काल्याक गेल्लों. तेदीस म्हाका दिस्ता ग्रह बरे नाशिल्ले. आमीं एका कुशीच्या घरांत खेळूं बशिल्ले. हांवें ते दिसा शंभरेक रुपया वगडायिल्ले. आनी आतांच म्हाका पासो फिरूं लागल्लो. इतल्यांत "सोल्दाद आयले सोल्दाद आयले" अशी बोंब जाली. मेळत तो जीव पट्टा तेकडेन धांवूंक लागलो. वतां वतां थोडे आदळून पडले. कांय जाण तांचे वैल्यानच गेले. हांव आनी म्हज संवगडी दोग तीग जाण धांवतां धांवतां एका बांयेंत पडले. आमचे पैलीं ततूंक एक क्रिस्तांव पडल्लो. ताजी बोंचडी फुटल्ली. आमचींय थोंपरां फुटलीं. उदक थोडें आशिल्लय न्. आमीं मोरूं पावले ना. गडबड थांबतकीच दुसरे दिस सकाळीं आनी भायर सरले. खेळटाले त्या जाग्यार येवन पळै जाल्यार सगळे जाण गेले. खंय शेंडून उरले ते दोग जाण आमकां मेळले. आमीं ५।७ जाण मेळून नवो खेळ केलो. म्हजें मनांक हांव वसांय भरतल्यार पुरो. पोण्ण खेळटां खेळटां हांव वगट्टां तसो वगट्टां आनी दनपार जाले म्होण्ण खेळ उठपाचो वेळ जालो. तीग जाण तर उठून गेले. होळू चौथोय गेलो. माणाक फक्त तीघ उरले. पैकीं हांव एक; सांतू एक, आनीक भोनू एक. ह्या भोनूक पोराक पैशे मेळयात. आनी ताका जीक आसा मोठी! हांव मांडतां तशे मांडतां आनी तो जिकता तशे जिकता. करतां करतां सगळे पैशे वगडावन हांव ताका ३०० रुपया उदारी जालों. होळूच तिसरो सांतूय उठलो. भोनू म्होणूं लागलो "आतां पुरो गा तो खेळ दाम शेणै, आमीय उठया." हांव कैफार आशिल्लों. हांवें सांगलें दोगच खेळया. पोण्ण

दोगांचो खेळ जायना! म्हजे कडेन पैशे नात. आनीक वेळ जालो म्हेोण्ण भोनू उठलोच.

म्हाका भोनूचो राग आयलो. पोण्ण करता किर्ते! ते दिसाऱ्यान हांव वचत थंय पडता तसो पडतां. घरचें रेंद खेळून खेळून तें पावना जातरीच हांवें बेंसाचेर रीण काडलें. लोक म्हणतात "पोर वाटे लागलो. भांगराचो संसार पोरान कावार केलो! आनी किर्तेय उल्लां जाल्यारय कोरतोलो. वोडा वोस घालून पोरान उदक घेवन वच्चें एवजिलांशें दिस्ता. आरे, खेळान कोणाचें बरें केलां? व्हडलीं व्हडलीं घरां बसलीं! ह्या पोराचो रे खंचो पार! आरे बऱ्या मनशान खेळाचें नांव पोसून घेव नये! धर्म-राजान ओगीच ताका श्राप दिलो ना!

खंचेय आक्तांक, पैशे वतरीच म्हजे संवगडीय म्हाका उलैतात! म्हजेर थुंक-तातय! ४।५ धरकां पताकशे म्हजे कोटाक अजूनय लागिल्लीं आसात. सगळें जरी जालें, तरी तळिराम जसो मरपोसून सोरो म्हणं, तशें, म्हजो मरपोसून खेळ. मनांत येता थंय खेळची सोय जावची म्हेोण्ण एक मुंबैची शेनरी, मोठ्या सेबांवातीचो एक मास, एक इस्पीक, चिंचारे, पाशे अशें सगळें सामान एका पोंटलेंत बांधून ती धपटी फाटीकच मारून फिरचें अशें हांवें एवजिलां. सांडलां थैंच सोदचेलें. तें दुसरेकडेन मेळूं आयलें ना. अशें म्हाका दिसता. म्हेोण्ण मरपोसून खेळ! खेळ!! खेळ!!!

---

# मराठींतील अनुच्चारित अनुनासिक

## ( श्री. रं. बा. रड्डीशास्त्री यांचे लेखास उत्तर. )

लेखक, प्रल्हाद धोंडो कानिटकर.

गु० रं. बा. रड्डीशास्त्री यांनीं महाराष्ट्र–साहित्य–पत्रिकेच्या तिसऱ्या अंकांत " मराठींतील अनुनासिक व त्यांचें लेखन " यासंबंधी आपले विचार प्रसिद्ध केले आहेत. त्यांत खालीं दिल्याप्रमाणें विषय आले आहेत:—

( अ ) संस्कृत भाषेंतील अनुस्वार, अनुनासिक व परसवर्ण;

( आ ) मराठी भाषेच्या लेखनांत अनुच्चारित अनुनासिक शीर्षबिंदूनें व्यक्त करण्याची पद्धत कायम ठेवावी असें प्रतिपादन करणाऱ्या पक्षाच्या पांच आक्षेपांस उत्तर;

( इ ) अनुस्वार, अनुनासिक व परसवर्ण या प्रत्येकाबद्दल स्वतंत्र लिपिचिन्ह उपयोगांत आणण्याबद्दल सूचना;

( ई ) झुंज, मांजर, चिंच वगैरे शब्दांत असणाऱ्या अनुस्वारांचे परसवर्णांत रूपांतर केल्यास संस्कृताप्रमाणें ञ् निष्पन्न होत नसून न् निष्पन्न होतो. यासंबंधीं व्यवस्था लावण्याबद्दल व्याकरणकारांस सूचना;

( उ ) अनुच्चारित अनुनासिकांबद्दल शब्दांवर शिरोबिंदु देऊं नयेत असें आपलें मत दिलें आहे.

शास्त्रीबोवा प्रसिद्ध वैयाकरण आहेत. यामुळें त्यांचें विवेचन संस्कृत नियमानुसार झालें आहे. परंतु मराठी भाषेंतील सर्व शब्दांचीं रूपें संस्कृतव्याकरणनियमानुसार होत नाहींत. महाराष्ट्री, अपभ्रंश व देशी या तीन भाषांचाहि विचार केला पाहिजे. प्राकृत भाषेचीं व्याकरणें उपलब्ध आहेत. अपभ्रंश भाषेचें व्याकरण हेमचंद्रानें केलें आहे. त्यावरून ज्ञानेश्वरींतील सर्व शब्दांचा उलगडा होत नसल्याचें ज्ञानेश्वरीव्याकरणांत कै० राजवाडे यांनीं लिहिलें आहे. गुजराथेंत नागरअपभ्रंश नांवाची अपभ्रंश भाषा होती असें लाहोर संस्कृत कॉलेजचे प्रिन्सिपाल वूलनर यांनीं Introduction to Prakrit या पुस्तकांत आपलें मत नमूद केलें आहे. हेमचंद्रहि गुजराथेंतच होता. यामुळें हेमचंद्रानें अपभ्रंश भाषेचे दिलेले नियम नागर-अपभ्रंशाचे असावेत.

"The only literary Apabhraṁśa described in detail by the grammarians is the Nāgara Apabhraṁśa which appears to have belonged to Gujarat......Even as it is, the tendencies of Apabhraṁśa in phonetics and grammar, as shown by the rules and specimens given by Hemachandra, help to bridge the gap between typical Prākrit and the modern languages."

Intro. to Prākrit, pages 6-7.

ज्ञानेश्वरींत नागर व देशी अशा दोन भाषांचे उल्लेख आहेत. परंतु ' नागर ' याचा अर्थ 'अभिजात' व ' देशी ' याचा ' मराठी ' असा आजपर्यंत मानलेला आहे. चालू सालीं डॉ. वा. गो. परांजपे यांनीं म. सा. पत्रिकेंत क्रमशः " भांडीर भाषेचें व्याकरण " प्रसिद्ध करण्याची तजवीज केली आहे. त्यांतील प्रस्तावना पहातां ज्ञानेश्वर-कालीं देशी नांवाची स्वतंत्र भाषा नियमबद्ध होती असें दिसून येतें. व या गोष्टीस देशीनाममाला, देशी कोश या कोशांवरून पुष्टी मिळते. गाथासप्तशती, गौडवध वगैरे प्राकृत भाषेंत लिहिलेल्या काव्यांतहि देशी शब्द असल्याचें टीकाकार सांगतात. यावरूनहि देशी भाषेचें स्वतंत्र अस्तित्व सिद्ध होतें. यावरून ज्ञानेश्वरींत उल्लेख केलेले "देशी" व "नागर" या शब्दांचा त्या नांवाच्या दोन भाषांशीं संबंध असावा अशी कल्पना येते. आजमितीस प्राकृत व्याकरणग्रंथ बरेच उपलब्ध असून अपभ्रंश भाषेचें फक्त हेमचंद्राचें व्याकरण आहे. तें हैमव्याकरणाच्या ८ व्या अध्यायाच्या चौथ्या पादांत ग्रथित केलें आहे. देशी भाषेचें व्याकरण उपलब्ध नाहीं. फक्त देशी भाषेचा कोश–देशी नाममाला–आहे. या उपलब्ध सामग्रीचा उपयोग केल्यास रड्डीशास्त्र्यांची विचारसरणी एकदेशीय व कांहीं स्थळीं चुकीची असल्याचें दिसतें. सबब महाराष्ट्री प्राकृत व हेमचंद्राची अपभ्रंश भाषा यांच्या अनुरोधानें प्रस्तुत लेख लिहिला आहे. आतां शास्त्रीबोवांच्या मुद्यासंबंधानें क्रमशः विचार करूं.

१ संस्कृत भाषेंतील सानुनासिक उच्चार क्रमाक्रमानें विराम पावत आले आहेत व ते पुढें लिपींतूनहि नष्ट झाले ही गोष्ट सर्वांस पटण्यासारखी आहे. परंतु महाराष्ट्री प्राकृतांत सानुनासिक उच्चारांचा पुनर्जन्म झाला व पायऱ्यापायऱ्यांनीं त्यांची वाढ होऊन त्यांनीं मराठी भाषेला हतवीर्य करून आपला पूर्ण पगडा वसविला आहे. या भाषाकंटकाचें निर्मूलन कसें होईल याची योजना करण्यांत एक पक्ष गुंतला असून अनुच्चारित अनुनासिकाचें अस्तित्व कायम राहावें अशी योजना करण्यांत दुसरा पक्ष गुंतला आहे. तथापि हल्लींचे अनुच्चारित अनुनासिक हे पूर्वीं उच्चारित अनुनासिक होते; त्यांचा उच्चार सोईकरितां बोलण्यांत होत नसला तरी व्याकरणदृष्टीनें ते कायम रहाणेंच इष्ट आहे.

निर्णयसागर छापखान्यांत छापलेली हालाची गाथासप्तशती पाहिली असतां वृत्तसुखास्तव अनुस्वाराचा अनुनासिक उच्चार करावा लागतो हें समजून येईल. अनु-

स्वारयुक्त अक्षरांवर तशा अर्धचंद्राकृति [ँ] खुणाहि त्या प्रतींत केलेल्या आहेत. ही गोष्ट प्राकृत पिंगलसूत्राच्या आधारानें केल्याचें टीकाकार सांगतो.

जइ दीहो वि अ वण्णो लहु जीहा पढइ सो वि लहु।

( छाया )

यदि दीर्घमपि वर्णं लघु कृत्वा जिह्वा पठति तदा सोऽपि वर्णो लघुरेव भवति । एतट्टीका । अस्माभिरपि यस्य गुर्वक्षरस्य लघ्वक्षरवदुच्चारणं भवति तदुपरि ँएतादृशमर्धचंद्राकारं चिन्हम् स्थापितमस्ति ॥

या प्रमाणें अनुस्वाराचा अनुनासिक उच्चार महाराष्ट्रांत प्रथम होऊं लागला.

मोरोपंतांसंबंधीं शास्त्रीबोवा जे लिहितात तें बादरायण संबंधासारखेंच आहे. मोरोपंतांचा जन्म पन्हाळगडावर झाला असला तरी त्या ठिकाणीं त्यांचें वास्तव्य फार नव्हतें. ते लवकरच बारामतीस आले व तेथेंच त्यांचा सर्व काळ गेला. यामुळें कोंकणी प्रदेशाच्या सांनिध्यानें त्यांनीं अनुनासिकें फार उपयोगांत आणिलीं हें म्हणणें पटत नाहीं. ठाणें, कुलाबा, रत्नागिरी वगैरे जिल्ह्यांत अनुस्वार व अनुनासिकांची गर्दी आहे याचें कारण प्रांतिक वैशिष्ट्य व व्याकरणशुद्ध जुनीं रूपें भाषाप्रचारांत अद्याप आहेत हें होय.

ज्या शब्दांच्या शिरोबिंदूंची शास्त्रीय पद्धति लावतां येत नाहीं असें शास्त्रीबोवा म्हणतात, त्या शिरोबिंदूंची शास्त्रीय पद्धति खालीं दिल्याप्रमाणें आहे.

ओंचा:—हा मराठी शब्द संस्कृत "अंचल" यापासून मराठींत आला आहे. मूळ शब्दांत अनुस्वार आहे तोच मराठींत राहिला आहे. यास "ओंजळ" या शब्दाचें प्रत्यंतर आहे. अंजलि: यापासून मराठींत अनुस्वारयुक्त शब्द 'ओंजळ" आला आहे.

खेंचणें } संस्कृत धातूंना आदेश होऊन महाराष्ट्री भाषेंत क्रियापदें झालीं
गोंवणें } आहेत. हे आदेशच मूळ धातु समजून अपभ्रंशद्वारा मराठीनें आपले धातु बनविले आहेत. मूळ संस्कृत धातूंत असलेला अनुस्वार प्राकृतांत बहुतेक ठिकाणीं येतो. "गोंवणें" हें क्रियापद गुंफ् या धातूपासून झालें आहे. असेंच दुसरें क्रियापद 'गंवसणें' हे मराठींत आहे. त्याचा मूळ संस्कृत धातु गवेष्; त्याचें महाराष्ट्रींत रूपांतर गमेस; नंतर अपभ्रंशद्वारा मराठी धातु गंवसणें.

टेंकडी, ढेंकूण वगैरे शब्द. मराठींत तद्भव, तत्सम व देशी शब्द आहेत. या मुळें देशी शब्द पाहिले असतां कांहीं बाबतींत शंका निवारण होईल. हेमचंद्रानें देशी नाममालेंत "ढंकुण, ढेंकुण" असें अनुस्वारयुक्त दोन शब्द दिले आहेत. त्यांपैकीं दुसरा शब्द मराठींत रूढ आहे. परंतु त्याचा उच्चार मात्र अनुस्वारयुक्त न करितां अनुनासिक करण्याची प्रवृत्ति झाली आहे. यावरून ओंचा, गोंवणें, ढेंकूण

यांतील शीर्षबिंदु विशिष्ट लोकांच्या उच्चारामुळें उत्पन्न झाला नाहीं हें लक्षांत येईल अशी आशा आहे.

स्वरांचीं चिन्हें लिपींत ठेविलीं नाहींत याचें कारण काय अशी शास्त्रीबोवांनीं पृच्छा केली आहे. त्याचें कारण वेद ब्राह्मणकालानंतर लिपींतून स्वरांचें उच्चाटन झालें हें होय. पाणिनीनें त्यांचा पुरस्कार केला नाहीं; व्यास–वाल्मीकादि आर्षमहाकवि कालिदासादि महाकवि, हाल, वाक्पतिराज, प्रवरसेन वगैरे प्राकृत कवि, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास वगैरे प्रासादिक संतकवि, व वामनपंडित, मोरोपंत वगैरे अक्षरगण-वृत्तांत कविता करणारे अभियुक्त कवि यांपैकीं कोणासहि स्वरांची अपेक्षा भासली नाहीं; व त्यांचें पुनरुज्जीवन करण्याचा कोणीहि आजपर्यंत लेशमात्र प्रयत्न केला नाहीं. स्वरांचीं चिन्हें लिपींतून नष्ट करण्याचा विशिष्ट मान कोणी मिळविला नाहीं व त्याबद्दल कोणी जबाबदारहि नाहीं. कलियुगांत मंत्रांचें सामर्थ्यच जर नष्ट झालें आहे तर मंत्रांना सामर्थ्य देणारीं स्वरचिन्हें निर्जीव अतएव नामशेष झालीं यांत आश्चर्य कसलें ? इंद्रशत्रो वर्धस्व। या ऋचेंतील "इंद्रशत्रु" या शब्दाचा उच्चार अंत्योदात्त न करितां पूर्वशब्दोदात्त केल्यामुळें वृत्राच्या मातापित्यावर जशी आपत्ति ओढवली तशी आपत्ति, मराठी भाषेंत कोणी मंत्र लिहीत नसल्यामुळें, ओढवणार नाहीं हें स्पष्ट आहे. तथापि मराठी भाषेंत सुद्धां शब्दांना स्वर आहेत व ते बोलण्यांत प्रतीत होतात ही गोष्ट कै. राजवाडे यांचे संकीर्ण लेख वाचले असतां समजून येईल.

मूळ संस्कृत शब्दांत अनुस्वार नसला तरी अपभ्रंश भाषेंत, शब्दांत 'म'कार असल्यास व तो शब्दारंभीं नसल्यास, त्या 'म' चा अनुनासिकयुक्त 'व'कार होतो:–

मोऽनुनासिको वो वा। हैम. व्या. अ. ८ पा. ४ सू. ३९७

संस्कृत–कमलम्; प्राकृत--कमल; अपभ्रंश—कमलु, कवँलु;

"—भ्रमरः।" भमरो, ,,—भमरु, भवँरु.

याच नियमानुसार मराठींत "नामन् व ग्राम" या संस्कृत शब्दांचीं रूपें अनुक्रमें "नांव व गांव" अशीं झालीं आहेत.

पूर्वी शब्द तोडून लिहीत नसत, वाक्यसमाप्ति उभी रेघ [दंडक] देऊन दर्शवीत असत ती पद्धत कां सुटली याचें उत्तर आगरकर यांचे निबंधांत सांपडेल. हा कालमहिमा आहे. पूर्वी कागद नव्हते म्हणून ताडपत्रावर लिहीत असत, शिलालेखांत अक्षरावर मात्रा न देतां अक्षराचे मागील बाजूस काना देत असत; परंतु हे दोन्ही प्रकार हल्लीं प्रचारांत नाहींत म्हणून ते पुन्हा अस्तित्वांत आणावेत काय ?

२ दुसरा मुद्दा:—"मराठींत शीर्षबिंदुशून्य अनेकार्थांचे वाचक शेंकडो शब्द आहेत." हें तथ्यकथन आहे म्हणून ग्राह्यच आहे. हा वाक्यप्रयोग मात्र शास्त्रीबोवांचे हृद्गत योग्य प्रकारें स्पष्ट करीत नाहीं. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ इतकाच

दिसतो कीं एकच शब्द शीर्षबिंदु नसूनहि अनेकार्थांचा बोध करितो. पण असें कोणत्या पक्षाचें म्हणणें आहे कीं मूळ संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश अथवा देशी शब्दांत शीर्ष-बिंदु नसून सुद्धां तो त्यापासून साधिलेल्या मराठी शब्दांत दिलाच पाहिजे! जेथें विहि-रींत नाहीं तेथें पोहऱ्यांत येणार कोठून? सर्व प्रकारांनीं समानवर्णात्मक शब्द असले तर पूर्वापार संबंधावरूनच त्यांचा अर्थ निश्चित करावा लागतो व त्याकरितांच अमर-कोशांत नानार्थ वर्ग किंवा तर्कसंग्रहांत "सैंधवमानय" या वाक्यानें प्रारंभ होणाऱ्या विषयांची उत्पत्ति झाली आहे.

टाक (लिहिण्याचा) या शब्दाचा टांक (वजनांतील) या शब्दाशीं कांहीं संबंध नाहीं; मात्र वजनांतील टांक हा शब्द संस्कृत टंक यापासून मराठींत आला आहे. त्यावर अनुस्वार पाहिजे. (उच्चार मात्र अनुनासिकाप्रमाणें होतो). टाक हें क्रियापद आहे त्याचा संबंध वरील दोन "टाक" या शब्दांशीं नाहीं.

घाट (नदीचा) हा शब्द संस्कृत 'घट्ट' यापासून आला आहे. मुळांत अनुस्वार नाहीं सबब मराठी पर्यायांतहि नाहीं.

घाट (बोलण्याचा किंवा भांड्याचा) हे दोन्ही शब्द संस्कृत धातु 'घट्' या-पासून निघाले आहेत. मुळांत अनुस्वार नाहीं सबब या शब्दांतहि नाहीं.

३. तिसरा मुद्दा :—शब्देतिहास. या बाबतींत शास्त्रीबोवा म्हणतात त्याप्रमाणें अव्याप्ति किंवा अतिव्याप्ति हे दोष मुळींच उत्पन्न होत नाहींत.

आत्मन्, राजन्, दशन् } वररुचीच्या प्राकृतप्रकाशांतील सूत्राप्रमाणें प्राकृत भाषेंत व्यंजनान्त शब्द नाहींत. अंत्यस्य हलः । शब्दानां योऽन्त्यो हल् तस्य लोपो भवति परिच्छेद ४ सू. ६

या नियमाप्रमाणें वरील शब्दांची प्राकृतांत आत्म, राज, दश अशीं रूपें होतात. नंतर आत्मनि पः । (परि. ३ सू. ४८) या सूत्राप्रमाणें आप्पा हें प्रथमेचें एक-वचन सिद्ध होतें.

राज पासून अपभ्रंश भाषेंत राउ, ज्ञानेश्वरकालीन रावो, व मराठींत राव हा शब्द सिद्ध झाला आहे.

दशन्—दशादिषु हः । या वररुचीच्या सूत्राप्रमाणें महाराष्ट्रींत 'दह' व मराठींतील 'दहा' हे शब्द साधले आहेत.

दाढ—मूळ संस्कृत शब्द दंष्ट्रा. दाढादयो बहुलम् । (परि. ४ सू. ३३) या सूत्रा-प्रमाणें दंष्ट्रापासून प्राकृत शब्द "दाढा" व त्याचें मराठींत रूपांतर "दाढ"

विंशति—प्राकृत भाषेंत "वीसइ"; मराठींत "वीस".

त्रिंशत्—प्राकृत भाषेंत "तीसं", मराठींत "तीस".

वरील विवेचनावरून मराठी भाषेंतील शब्द व्याकरणशुद्ध असल्याचें व त्यांत शिरोबिंदूंची अपेक्षा नसल्याचें गुरुवर्यांचे ध्यानीं येईल अशी आशा आहे.

पांघरुण, अंथरुण वगैरे शब्द :–पांघरुण हा शब्द संस्कृत प्रावरण यापासून निघाला नाहीं. हेमचंद्रानें देशीनाममालेंत प्रावरण या अर्थाचा "पंघरुणम्" असा देशी शब्द दिला आहे व त्याचेंच मराठी स्वरूप पांघरुण हें आहे.

वरील विवेचनावरून अव्याप्ति, अतिव्याप्ति हे दोष येत नाहींत अशी खात्री होईल.

शब्दाचा इतिहास शिरोबिंदूवरून कसा समजतो तें खालील उदाहरणांवरून व्यक्त होईल.

वक्रम् हा संस्कृत शब्द आहे. वक्रादिषु। परि. ४ सू. १५ या वररुचीच्या सूत्राप्रमाणें "वक्र" याचें प्राकृत रूप "वंक" असें होतें व त्यापासूनच मराठींत "वांक, बांक" हे शब्द आले आहेत. प्रचारांत जरी शीर्षबिंदूचा उच्चार होत नसला तरी शब्देतिहासाकरितां तो कायम ठेवणें जरूर आहे; कारण तो आगंतुक नसून शास्त्रशुद्ध आहे.

हस्त–हत्थ–हाथ–हात.<br>
कर्ण–कण्ण–काण–कान } बाजूस दिलेली हात व कान यांची संस्कृतापासून मराठींत येण्याची परंपरा आहे अशा शब्दांचा इतिहास त्यांच्या वर्तमान मराठींतील रूपांतच गुप्त असतो. त्या रूपांत कोणी ढवळाढवळ केल्यास तो इतिहास नष्ट होईल हें म्हणणें शास्त्रशुद्ध आहे. तिसऱ्या मुद्यावरील शास्त्रीबोवांचें विवेचन प्रमाणभूत मानतां येणार नाहीं.

४ चवथा मुद्दा—लिपी उच्चारानुसारी ठेवावी किंवा संप्रदायानुसारी ठेवावी ? या मुद्याचें उत्तर प्रत्येकानें स्वतःचें या बाबतींत सूक्ष्म निरीक्षण केल्यास सहज समजेल. भाषांचे प्रकार दोन; एक जिवंत व दुसरी मृत. मृत भाषेचें व्याकरण व स्वरूप सर्व बाजूंनीं स्थिर झालेलें असतें; जिवंत भाषेचें स्वरूप हळुं हळु पालटत असतें व याचें ढोबळ उदाहरण हल्लींचा "अनुच्चारित अनुनासिकाचा" वाद हें होय. पाणिनीच्या नियमाप्रमाणें सिद्ध होणारें–रामो गच्छति–हें वाक्य पाणिनीकालापासून आजपर्यंत संस्कृत भाषा ज्ञात असलेल्या कोणत्याहि देशांत उच्चारानुसार लिहिलें जात आहे. हें तत्व जिवंत भाषांस लागू पडणार नाहीं. आपण घरगुती बोलतांना, मित्रमंडळींत बोलतांना व सभेंत व्याख्यान देतांना व्याकरणाच्या नियमांकडे लक्ष देऊन बोलतों कीं काय याचा विचार करावा; तसेंच पत्र लिहितांना, किरकोळ टिपणें लिहितांना, दस्तऐवज वगैरे व्यवहारिक लेख लिहितांना, वृत्तपत्राकडे लेख पाठवितांना व एखाद्या ग्रंथाचें लेखन करितांना उत्तरोत्तर शुद्धलेखन, व्याकरण वगैरे बाबतींत जास्त काळजी घेतों हाहि अनुभव सर्वांसच आहे. लेखाचें चिरस्थायित्व व वाच-

णारांची संख्या या दोन गोष्टींस मुख्य महत्त्व असतें व त्या दृष्टीनें व्याकरणशुद्ध व संप्रदायशुद्ध लेख असणें अत्यंत आवश्यक आहे. मोडी लिहिण्यांत व नित्य व्यवहारांतील बोलण्यांत अनुच्चारित अनुनासिक नाहीं, ही शास्त्रीबोवांनीं पुरस्कृत केलेल्या पक्षास समाधान मानण्यास जागा आहे.

येथवर केलेल्या विवेचनावरून अनुनासिक अनुच्चारित आहे म्हणून त्याचा त्याग करणें श्रेयस्कर नसून त्याची परंपरा लक्षांत घेतल्यास तो ठेवणें इष्ट आहे अशी शास्त्रीबोवा व त्यांनीं पुरस्कृत केलेल्या पक्षाची खात्री होईल अशी आशा आहे.

५ पांचवा मुद्दाः—भाषेस नियम असले म्हणजे मनोहरत्व येतें ही गोष्ट उभयपक्षांसहि मान्य आहे. या मुद्दयाचें तत्त्व इतकेंच आहे कीं व्याकरणशुद्ध रूपें भाषेंत—विशेषतः लेखांत-- योजावीं. कांहीं शीर्षबिंदु संस्कृत शब्दांत नसले, तरी त्याच्या प्राकृत अगर अपभ्रंश अगर देशी पर्यायांत उद्भूत झालेले आहेत. त्यांपैकीं कांहींचे उच्चार बोलण्यांत होत नसले तर त्याचें कारण, सोय, आळस, निष्काळजीपणा, व्याकरणज्ञानाचा अभाव, उच्चारदौर्बल्य, देशप्रचार, रूढी, मास—मांस यांसारखे खालीं दिल्याप्रमाणें समान व व्याकरणशुद्ध शब्दांचा भाषेंत भरणा, यांपैकीं कोणतेंहि होऊं शकेल.

मांसादिषु वा । परि. ४ सूत्र १५.

मांसादिषु तु शब्देषु विभाषा विन्दुरुच्यते ।
मांसं मासं च मंसं वा कथं चापि कहं कह ॥

प्राकृतमंजरी, पृ० ५६

वरील सर्व मुद्दयांवरील विवेचनाचा इतकाच निष्कर्ष आहे कीं व्याकरणशुद्ध बिंदुयुक्त शब्द भाषेंत ठेवावेत, मग ते बिंदु उच्चारित असोत वा अनुच्चारित असोत. यामुळें शास्त्रशुद्ध परंपरा कायम राहील; शब्दांची व्युत्पत्ति, अर्थ, लिंग, वचन यांचा यथार्थ बोध होईल; शब्दांचा इतिहास नष्ट होणार नाहीं व व्याकरणशुद्ध शब्द भाषेंत राहिल्यानें भाषेस मनोहरत्व येईल.

उच्चारानुसारी लिपी करण्याचा प्रयत्न केल्यास शुद्ध शब्दांचें स्वरूप विकृत होऊन पूर्वेतिहास व संप्रदाय नष्ट होईल. उच्चारानुसारी लिपी करण्याचा प्रयत्न—उच्चाराप्रमाणें शब्दांचें Spelling करणें—अमेरिकेंत अलिकडेच निष्फळ ठरला आहे.

लेख पुरा करण्यापूर्वीं शास्त्रीबोवांनीं उपस्थित केलेल्या एका मुद्यावर लिहिणें आवश्यक आहे.

झुंज, मांजर, चिंच इत्यादि शब्दांत न् या व्यंजनाचा उच्चार होतो. तो तसा लिहिण्याची वहिवाट सुरू करावी असें म्हणणें आहेः उदा० झुन्ज, मान्जर, चिन्च.

संस्कृतप्रमाणें मराठींत तालव्य ‘चवर्ग’ असून शिवाय एक दंत्य—तालव्य

'चवर्ग' आहे. या दुसऱ्या च वर्गांतील शेवटचा वर्ण सूक्ष्म उच्चार करून पाहिला असतां न् असाच होतो. च्, छ्, ज्, झ्, प्रमाणें ञ् चा दंत्य-तालव्य उच्चार होत नाहीं. इतकेंच नव्हे तर एकाच शब्दांत दोन्ही प्रकारचे चवर्ण येतात त्या वेळीं अनुस्वाराच्या पुढील 'च' ज्या प्रकारचा असेल त्या अनुरोधानें ञ् किंवा न् चा उच्चार होत असतो.

चिंच = चि तालव्य; च दंत्यतालव्य.
अनुस्वाराचा उच्चार न्.
चंची = च दन्त्य--तालव्य; ची तालव्य.
अनुस्वाराचा उच्चार ञ्.

दंत्यतालव्य च्, छ्, ज्, झ् यांच्या उपांत्य अनुस्वाराचा परसवर्ण लिहिणें झाल्यास न् लिहिण्यास हरकत दिसत नाहीं. परंतु मराठी भाषेंत दंत्यतालव्य 'चवर्ग' आहे हें प्रथम ठरवून ते वर्ण ओळखण्याचें चिन्ह निश्चित होणें जरूर आहे. कै० राजवाडे यांनीं ज्ञानेश्वरी-व्याकरणांत (पृ० ३) या संबंधीं चर्चा केली आहे ती जिज्ञासूंनीं पहावी.

मराठींत विभक्तिप्रत्ययांत जे अनुस्वार आहेत त्यांची उपपत्ति ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत सांगोपांग सांपडेल. कै० राजवाडे यांनींहि अनुस्वारांचा विचार एका स्वतंत्र लेखांत केलेला आहे. त्यांचे संकीर्ण लेख वाचल्यास तो समजेल. हल्लींच्या वादग्रस्त विषयाचा निर्णय देण्यापूर्वीं कै. राजवाडे यांचें म्हणणें लक्षांत घेऊन या विषयाचा निर्णय व्हावा अशी उभय पक्षांस विनंति करून आपली रजा घेतों.

---

# गुजराथेंतील मराठीभाषेंतील रूढ शब्द.

(लेखक :–वासुदेव विनायक जोशी, बडोदें.)

दमाजीराव गायकवाड यांनीं सन १७३४ सालीं बडोदें घेतलें. तेव्हांपासून गुजराथेंत कायमचें ठाणें देऊन दक्षिणी लोक राहूं लागले, आणि अहमदाबाद, खेडा, भडोच, पंचमहाल, सुरत इत्यादि एका काळीं मराठेशाहीच्या साम्राज्यांत मोडणारे प्रांत इंग्रजांच्या ताब्यांत गेल्यानें गुजराथेंतील दक्षिणी लोकांचें उच्चाटन झालें. तत्रापि सर्वंध गुजराथ प्रांताच्या मध्यभागीं विराजमान होणारें आणि तुटकतुटक प्रांताच्या विस्तारानें सर्व गुर्जरप्रांताशीं एका वेळीं परिचित असलेल्या मराठेशाहीच्या सत्तेचें केंद्रीकरण करणारें बडोदें शहर आजहि मराठी भाषेच्या सेवेच्या कामीं सुविख्यात आहे. रावबाजींच्या कारकिर्दींत इकडे बडोद्यास राज्य करणारे फत्तेसिंहराव गायकवाड यांनीं ललितानंद, अनंतफंदी, होनाजीबाळ, सगनभाऊ इत्यादि महाराष्ट्रीय शाहीर कवींना आश्रय दिला; आणि त्यांच्या काव्यकुसुमांचे ताटवेच्याताटवे बडोद्यास फुलवून मराठे सरदारांच्या क्षात्रतेजाचे भ्रमर गुंगवून ठेवण्याचें श्रेय संपादिलें. सध्यांच्या महाराजांच्या कारकिर्दींत साहित्यवृक्षाच्या अनेक शाखांवर निरनिराळया फळांचे घडच्याघड धरूं लागले आहेत. कै० विनायकराव कीर्तने, नागेशराव बापट, शंकर मोरो रानडे, दत्तोपंत घाटे, बर्वे इत्यादि दिवंगत व्यक्तींच्या लिहिण्याचा परिमळ विस्मृतीमुळें नाहींसा झाला असला तरी अभिजात वाङ्मयसेवेचें खडतर व्रत चालविणारे कवि चंद्रशेखर आणि ऐतिहासिक दप्तरांच्या फुलापाचोळ्यांत विखुरलेले संशोधनाचे कण एकत्र जमवून मधुसमर्पण करणारे इतिहासकार सरदेसाई हे बडोद्याच्या अखंड वाङ्मयसेवेबद्दल साक्ष देण्यास आज विद्यमान आहेत, आणि तीच परंपरा चालू ठेवण्यास सज्ज असलेले अनेक विद्वान या मराठेशाहीच्या राजधानींत बसून कलम चालवून महाराष्ट्रांत बहादुरी मिळवीत आहेत. बडोद्यास मराठी राज्य शिल्लक राहिल्यानें शिंदे, होळकर, गायकवाड यांच्या आधारावर इकडे आलेले आणि निरनिराळ्या प्रांतांत पांगलेले दक्षिणी लोक बडोदें हें मध्यवर्ती ठिकाण समजून जमा झालेले असोत अगर निव्वळ गायकवाडांच्या आश्रयानें इकडे आलेले असोत; पण खुद्द बडोदें शहरांत नव्वद हजार लोकसंख्येपैकीं सुमारें वीस एकवीस हजार वस्ती दक्षिणी लोकांची आहे. मराठी भाषेच्या पसाऱ्याच्या दृष्टीनें परप्रांतांत एका गटांत राहणारी येवढी मोठी मराठी बोलणाऱ्यांची संख्या इतरत्र क्वचितच सांपडेल.

गुर्जराधिप सेनाखासखेल समशेर बहादरांच्या मार्फतीनें मराठेशाहीच्या नव्या राजधानीकडे–पुण्याकडे–जाणारी पैशाची खंडणी बंद झाली तरी तेथें चिकाटी धरून

राहणाऱ्या कलमबहाद्दरांनीं पैशाहूनहि अधिक मौल्यवान अशा लेखनसंपत्तीचा झरा दाक्षिणेकडे सतत वाहत ठेऊन मराठेशाहीची अवशिष्ट पुण्याई जी मराठीभाषा तिचा राज्यकारभार सुयंत्रित चालावा म्हणून ही खंडणीच दिली नाहीं तर काय? हे सर्व कलमबहाद्दर बहुतांशीं दक्षिणेंतून आलेले, तेव्हां त्यांच्या लिखाणांत व भाषेंत इकडचे प्रांतिक विशेष फारसे रूढ झाले नाहींत. त्यांचें शिक्षण महाराष्ट्रांत झालेलें; बालपणहि तेथेंच गेलेलें, तेव्हां साहजिकच त्यांच्या तोंडीं अस्सल मराठीच बसलेली होती तीच त्यांच्या लेखणींतून उतरली. दुसरें असें कीं, लेख्यभाषा म्हणून एक विशिष्ट प्रकार आहे, त्यांतहि नागर अगर प्रौढ भाषेचे विवक्षित शब्द ठरलेले आहेत; त्याच शब्दांचा वा शब्दप्रकारांचा उपयोग केला पाहिजे हा जो एक लेखकांच्यावर निर्बंध असतो त्यामुळें येथें जन्मलेल्या व वाढलेल्या लेखकांच्या लिहिण्यांतहि होतां होईल तों प्रांतिक आर्ष-शब्द टाळण्यांत येत असतात. 'बोलावें तसें लिहावें, आणि हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां हें बोलण्यानें समजतें' ही जी एका नवीन सांप्रदायी व्याकरणाची व्याख्या होऊं पाहत आहे, ती व्याख्या सर्वसंमत ठरल्यास औचित्याच्या आडसरानें थोपवून धरलेल्या अनेक आर्ष, ग्राम्य, प्रांतिक, परभाषीय शब्दांच्या झुंडीच्या झुंडींना आंत घ्यावें लागेल; व अशांची टेहळणीहि बारकाईनें करणें जरूर आहे. तसेंच शुद्धिचळवळीची विभूति भाषासुंदरीस फासून तिला जोगीण बनविणें नसेल तर मराठी बोलणारांच्या तोंडीं रूढ असलेले परभाषेंतील शब्द विशेष अर्थबोधक, सुटसुटीत, कार्यक्षम अतएव ग्राह्य आहेत कीं काय याचा विचार शब्दसंपत्तीच्या खजिन्यांत भर टाकण्याच्या वेळीं अवश्य करावा लागेल. तिसरें कारण असें कीं, उपर्युक्त दोन्ही कारणें उपेक्षणीय असलीं तरी परप्रांतीय जे बोलतील त्याचा अर्थ समजावा, एवढ्याकरितां तरी परप्रांतांत राहणाऱ्यांच्या तोंडीं बसलेल्या शब्दांची तोंडओळख असणें जरूर आहे. परप्रांतांतून मराठीची शिक्षण-संस्थेंतून होणाऱ्या पिछेहाटीचा निषेध करण्याचा ठराव पुणें येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाचे वेळीं चर्चेस निघाला असतां महाराष्ट्रियांनीं परभाषेंतून शिक्षण घ्यावें असें कित्येक विद्वानांनीं केलेलें विधान पुष्कळांना आठवत असेल. परप्रांतीय महाराष्ट्रियां-बद्दलची हीच बेफिकीर वृत्ति खुद्द दक्षिणमहाराष्ट्रांत वृद्धिंगत होईल तर मराठी भाषा आणि महाराष्ट्रीय संस्कृति यांना पारखे झालेले दक्षिणी लोक त्या त्या प्रांतांतील लोकांत मोडूं लागतील व दूरवर पसरलेल्या महाराष्ट्रियांची संख्या संपुष्टांत येईल, जिव्हाळ्याचे धागे-दोरे नष्ट होतील. मग महाराष्ट्र असा केवढासा शिल्लक राहील? त्याची बोलबाला तरी कोण करील? केवळ भाषेच्या तटबंदीनें म्हैसूर-मद्रासकडे गेलेले दक्षिणी लोक आपणास परजातीय झाले, व सर व्ही. पी. माधवरावांसारख्या कोंकणस्थ दक्षिणी ब्राह्मणाच्या पराक्रमावर महाराष्ट्रियांस हक्क सांगतां येत नाहीं. गुजराथेंत बोलली जाणारी मराठी भाषा गुजराथीशब्दप्रचूर असून मराठी बोलणाऱ्यांना गुजराथीहि चांगलें बोलतां–लिहितां येत असल्यामुळें दक्षिणी लोकांची मातृभाषा गुजराथी होण्यास फारसा अवधी लागणार नाहीं. आजचे रूढ असलेले गुजराथी शब्द मराठी भाषेचें क्षेत्र हळूहळू काबीज कर-

तीलच. यावरून परप्रांतांत असलेला मराठी भाषेचा विस्तार काळजीपूर्वक जतन करण्याची आवश्यकता नजरेस येणार आहे. तसेंच शुद्धलेखनांत डोकाऊं पाहणारा नवीन सांप्रदाय कितपत ग्राह्य करावा या प्रश्नाच्या चर्चेसहि त्यामुळें योग्य ती मदत होईलसें वाटतें.

मराठींत गुजराथी शब्द रूढ होण्याचीं कारणें अनेक देतां येतील. नित्य गुजराथी बोलणांशीं व्यवहार करावे लागत असल्यानें त्यांच्या तोंडचे शब्द तोंडीं वसणें अपरिहार्य होय. गायकवाड सरकार हे दक्षिणी मराठ्यांचें संस्थान असल्यामुळें सुमारें ३०–४० वर्षांपूर्वीपर्यंत दरबारी भाषा मराठी होती; त्यामुळें गुजराथी लोकांस परिचित असलेले शब्द अर्थबोधाच्या सौकर्यामुळें न कळत वापरण्यांत येऊं लागले. आणि कोर्टकचेऱ्यांतील दप्तरांत त्यांचें चलन झपाट्यानें सुरू झालें. अजूनहि खानगीखातें व सेनापतीखातें यांचें लिहिणें मराठींतूनच चालतें तरी त्यांत हे गुजराथी शब्द सढळ हातानें उपयोगांत आणिलेले दिसतात. कित्येक शब्द सुटसुटीत, अर्थबोधक, समर्पक असे असल्यानें त्यांचा उपयोग करण्याशिवाय गत्यंतर नसतें. कदर, भलामण, फरज, खामी इत्यादि शब्दांचा अर्थ मराठींत व्यक्त करणें झाल्यास अनेक शब्दसमुच्चय वापरावे लागतील आणि असे शब्द नागर मराठी भाषेंत रूढ झाल्यास शब्दसंपत्तींत किंमती जिनसांची भर पडेल यांत शंका नाहीं.

गुजरार्थेतील महाराष्ट्रीय म्हणजे दक्षिणी लोकांच्या तोंडीं नित्य व्यवहारांत कित्येक गुजराथी शब्द अगर मूळ गुजराथी शब्दांपासून साधित असे गुजराथी मराठी शब्द येत असतात त्यांपैकीं खालीं कांहीं शब्द देत आहोंत.

अध्धर = अधांतरीं
आगाशी = गच्ची
आरव्खा = सबंध
अधुरें = अपूर्ण, अर्धें
अखत्यार = अक्त्यार = अधिकार
असर = परिणाम; जसें असरकारक भाषण
ओच्छवधत = कमीजास्त
अशील = पक्षकार
इजारा = मक्ता
उकाळा = उकाळो = काढा
एकठे करणें = एकत्र करणें, जमविणें
कदर = बूज : कदर करणें
कसूर = अपराध. कसूरदार = अपराधी
करा = चांदईची भिंत
कादव = चिखल
कुदणें = उडी मारणें
कुदी खाणें = उडी मारणें
कुवा = विहीर
कोशीस करणें = प्रयत्न करणें
कंकास = जंजाळ
खामी = दोष, वैगुण्य, अपराध
खडीया = दौत
खेडूत = शेतकरी
खेतर = शेत
खोट = तोटा
खोळणें = शोधणें
गणवत = कबुलायत, खंडचिठ्ठी
गाळागाळी = शिवीगाळ
गिरो = गहाण
गुजराण = उपजीविका

गांडा = वेडा
गुमडें = गळूं
घराक = गिऱ्हाईक
घराकी = गिऱ्हाइकी
घरमेळे = आपसांत; जसें, घरमेळे निकाल केला
चावी = किल्ली
चोढणें = चिकटविणें
चोटणें = चिकटणें
चूटणी = निवडणूक
चेतवणी = समज
चोकडी = मोरी
छरी = सुरी
छज्जू = सज्जा
जाजरू = संडास
जथा = जमाव, ढीग
झडप = तडफ
टेव = संवय
टकोरा = ठोका
टूंका = अपुरा, लहान, थोडा; जसें, टूंका पगार
टूटीया रोग = इन्फ्लुएन्झा
ढील = विलंब
ढोर = जनावर
ताजवा = तराजू
तंगी = कमतरता
तोड करणें = निकाल करणें
तंदुरुस्ती = आरोग्य
तोफान = दांडगाई, मस्ती
दबाण = वजन
दख्खल = व्यत्यय, हरकत
दांडी पिटणें = दवंडी पिटणें
दिवेल = एरंडेल, तें दिव्यांत जाळतात म्हणून एरंडेल. मराठींत दिवेल आणि खोबरेल हे पदार्थ अर्थात भिन्न आहेत.
धीरणें = कर्जाऊ रकम देणें
धीरनार = पैसे कर्जाऊ देणार
नळीयें = कौलें
नाबूद करणें = नष्ट करणें
नेवा = पाघोळी
परचुरण = किरकोळ, मोड
परसाळ = ओसरी
पाटडी = तुळई
पवालें = फुलपात्र
पधरामणी = आगमन
पाडोशी = शेजारी
पथारी = बिछाना
फाटणें = फुलणें, उतास येणें. जसें, कपास फाटला = फुटला, तो फाटला आहे = उन्मत्त झाला आहे, उतला आहे.
फरेब देणें = फसविणें
फरज = जबाबदारी; माझी फरज आहे.
बारी = खिडकी
बारणूं = दार
बूम पाडणें = ओरडणें, आरोळी मारणें
भलामण = शिफारस
भाडुवात = बिऱ्हाडकर
मकान = घर
मांदा = आजारी
मिळणें = भेटणें
मेडा = माडी
मच्छर = डांस
माकण = ढेंकूण
माथें पिकवणें = डोकें उठविणें
माथ्याचा = हेकेखोर, हट्टी
मांडून वाळणें = पूज्य करणें, देणें मांडून

वाळलें म्ह० देणें पूज्य केलें; सूट देणें
मोभा = इतमाम
मेलापी = मदतगार
मुष्केली = अडचण
मोत = मरण
रेल = पूर
रेडणें = शिंपडणें, ओतणें. जसें, पाणी रेडलें
रोकाण = हरकत, अडथळा
रखडणें = भटक्या मारणें
लवाजम = वर्गणी, फी
लास = प्रेत
वरघोडा = मिरवणूक
वेहेंचणी = वांटणी
वेचाण = विक्री
सखत = कडक, सक्त: सखत ऊन = कडक ऊन: सखतकैद = सक्त मजुरी
सगीर = अज्ञान
होहा = आरडाओरड
हाडमारी = त्रास
हुल्लड = दंगा, हल्ला

शब्द तेच परंतु मराठींत त्याचें अस्सल स्वरूप योजण्यांत येतें. शब्द सारखे असल्यानें गुजराथीप्रमाणें प्रचारांत येतात आणि ते लिहिण्यांत अर्थात मूळचें स्वरूप कायम राहतें. अशा शब्दांबद्दलच्या चुका येथील लेखकांच्या हातून पुष्कळ वेळां न-कळत घडतात, असे शब्द खालीं ठळकठळक देतों.

विगेरे = वगैरे
तैयार = तयार
तकरार = तक्रार
मरेठा = मराठा
रात = रात्र
करज = कर्ज
कायदेसर = कायदेशीर
केद = कैद
खाडा = खड्डा
खानगी = खासगी
गेर = गैर. हा प्रत्यय नेहमीं गेर असा लिहितात; जसें, गेरसमज, गेरवाजवी, गेरकायदे इत्यादि
चोक = चौक
चोकशी = चौकशी
जाहेर = जाहीर
जुवानी = जवानी
झुंपडी = झोपडें
झेरी = जहरी
ठेकाणूं = ठिकाण
ठाणूं = ठाणें
देवाळूं = दिवाळें
पांजरू = पिंजरा
पेहेरो = पाहरा
प्रकरण = प्रकर्ण
बिगाड = विघाड
बेठक = बैठक
भरोंसो = भरंसा
लखाण = लिखाण
शरत = शर्त
साहूकार = सावकार

मुळच्या गुजराथी शब्दाचें लिंग कायम ठेविल्यानें फरक होतो: जसें:—
तार आला = तार आली. आमची दुकान वंद केली = आमचें दुकान वंद केलें.

मुळचे गुजराथी शब्द उपयोगांत आल्यास लिंगादि उपाधी कायम राहतात. जसें:—
रेल आली = पूर आला. लास सांपडली = प्रेत सांपडलें.

गुजराथेंत प्रचारांत असलेली विशेषनामेंहि पुष्कळ उपयोगांत येतात; जसें:— लालजी, लालाजी, रणछोड, रेवा, चंदुलाल, मोतीलाल, मोतीभाई, बबु, वगैरे.
गुजराथ प्रांतांत प्रचलीत असलेल्या मराठींत आणि शुद्ध मराठींत किती अंतर असतें, हें खालील छोटेखानी उताऱ्यावरून दिसून येणार आहे. अर्धेंआधिक शब्द गुजराथी जसेच्या तसे अगर अपभ्रंशानें उपयोगांत येत असल्यामुळें गुजराथप्रांतांतील बोलली

जाणारी मराठी भाषा शुद्ध मराठी नसून मराठीगुजराथी अशी मिश्र भाषा असावी असा भास होतो. अशा स्थितींत 'बोलावें तसें लिहावें' हा व्याकरणनियम म्हणून शुद्धाशुद्धतेच्या निर्णयास उपयोगी पडणार नाहीं. नागर अगर दरबारी भाषेचें जें एक सांकेतिक स्वरूप त्याचें संरक्षण कृत्रिम वाटणाऱ्या नियमांनीं करण्यांत आलें नाहीं तर ह्या नवीन नियमास भाषेचा अपकर्ष करण्याचें श्रेय संपादावें लागेल. मराठी भाषेचा उत्कर्ष व्हावा म्हणून योजण्यांत येणारा हा सांप्रदाय एकटया शुद्ध मराठीचीच जोपासना करण्याच्या कामीं फोल ठरेल. आणि शुद्ध मराठी भाषेच्या रोंपटयासभोंवतीं मिश्र अगर आर्ष भाषेचीं झुडपीं कायम राहिल्यानें पुढें मागें मिश्रभाषा हीच प्रधान भाषा होणार नाहीं अशी खात्री देतां येत नाहीं. तसेंच वरील चर्चेवरून बृहन्महाराष्ट्रांतल्या लोकांच्या मातृभाषेचें संरक्षण करण्याकडे खुद्द दक्षिणमहाराष्ट्रानें कानाडोळा करणें किती धोक्याचें आहे तें समजून येणार आहे. गुजराथेप्रमाणेंच ग्वालेर, इंदूर, दक्षिण हैद्राबाद इकडील मराठी भाषेवर हिंदुस्थानी अगर फारसी भाषेचें सावट पडलेलें दिसेल. यावरून या प्रश्नाची व्याप्ति आणि महत्त्व दिसून येणार आहे.

### गुजराथी-मराठी

मुलगा तोफान करितो म्हणून त्याच्या आईनें त्यास मारलें आणि त्यास ओरडींत पुरून ठेऊन बाहेरच्या बारण्यास सांकळ दिली. कांहीं वेळानें आईनें बारणूं खोललें तों मुलगा दिसेना, लपून बसला असेल म्हणून तिनें पथाऱ्या फिरवून पाहिल्या परंतु कांहीं ठिकाणा पडेना. तेव्हां त्यास खोळण्यासाठीं ती निघाली आणि चोऱ्यावर आली. तों एका लहान मुलाची लास तेथें झांकून ठेवलेली तिला दिसली. व तो एकंदर बनाव पाहून आपल्याच मुलास मोत आलें असें मानून ती रडाकूट करूं लागली.

इकडे त्या मुलानें ओरडीची बारी उघडली आणि त्यांतून कुदी मारून तो बाहेर पडला तो रखडत रखडत चोऱ्यावर येतो तों आईस कंकास करीत असल्याचें त्यानें पाहिलें. व मा म्हणून हांक पाडली. त्यासरशीं तिची खात्री होऊन तिचें दुःख मटून गेलें. व बेउजण घरीं आलीं.

### शुद्ध मराठी

मुलगा दांडगाई करितो म्हणून त्याच्या आईनें त्यास मार दिला व खोलींत कोंडून ठेऊन बाहेरच्या दारास कडी घातली. कांहीं वेळानें आईनें दार उघडलें तों मुलगा दिसेना, लपून बसला असेल म्हणून तिनें वळकटया इकडच्या तिकडे करून पाहिल्या. परंतु कांहीं मागमूस लागेना. तेव्हां त्यास शोधण्यासाठीं ती निघाली आणि चावडीवर आली. तों एका लहान मुलाचें प्रेत तेथें झांकून ठेविलेलें तिला दिसलें व तो एकंदर प्रकार पाहून आपल्याच मुलास मरण आलें असें समजून ती आक्रोश करूं लागली.

इकडे त्या मुलानें खोलीची खिडकी उघडली आणि त्यांतून उडी मारून तो बाहेर पडला. तो भटकत भटकत चावडीवर येतो तों त्यास आई आक्रोश करीत असल्याचें दिसलें व त्यानें 'आई' म्हणून हांका मारली. त्यासरशीं तिची खात्री होऊन तिचें दुःख दूर झालें व उभयता घरीं आलीं.

---

# ई–उ–कारान्त संस्कृतागत नामें मराठींत प्रथमेंत कशीं लिहावीं ?

( लेखकः— गोविंद कृष्ण मोडक )

**१ प्रस्तुत शीर्षकाचा अर्थ**––मति, भानु यांसारखीं संस्कृतांतील ह्रस्व इ–उ–वर्णान्त नामें मराठींत प्रथमेंत दीर्घान्त म्हणजे मती, भानू अशीं लिहावीं कीं नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर देण्याचा येथें प्रयत्न करीत आहें. हीं नामें बोलण्यांत दीर्घान्त होतात, हें तर प्रश्नातीतच आहे. विचार करणें तो फक्त तीं तशीं दीर्घान्त लिहावीं कीं नाहीं ?–एवढ्याचपुरता.

**२ विवेचनाची दिशा**—प्रश्न ( १ ) इ–उ–वर्णान्त म्हणजे यु–वर्णान्त शब्द मराठींत कसे सांपडतात, दीर्घान्त कीं ह्रस्वान्त ? ( २ ) संस्कृतांतील ह्रस्व यु–वर्णान्त शब्द मराठींत आले आहेत कीं नाहींत ? आले असल्यास त्यांचें मराठींतील रूप कसें आहे ? उत्तर ( १ ) मराठींत तद्भव किंवा देशी शब्द ' जलदी, कांहीं, गहू, तट्टू ' असे दीर्घान्त अनेक आहेत. निदान उच्चारतः तरी ते दीर्घान्त आहेतच; ते ह्रस्वान्त कधींच नसतात. (२) ह्रस्व युवर्णान्त संस्कृत शब्द मराठींत पदोपदीं आढळतात. त्यांचे यावच्छक्य प्रकार पुढील––प्रमाणें सात आहेत. पुं० कवि, धनिन् (समासांत पूर्वावयव असतांना हा शब्द धनि असा आढळतो. ), भानु, स्त्री० मति, धेनु, न० दधि, वस्तु. प्रश्न––असे हे शब्द मराठींत कसे योजावे ? तत्सम म्हणून आहेत तसे ह्रस्वान्त राखून, कीं तद्भव म्हणून दीर्घान्त करून ? ( १ ) धनिन् हा शब्द धनी या रूपानें आपण तद्भव म्हणून योजितों. (२) वस्तु–चा वस्त ( ३ ) रीति–चा रीत, असे तद्भव शब्द आपण करितों. येथें आपण अंत्य युवर्ण टाकून, तत्स्थानीं दीर्घ किंवा अकार योजितों. (३) अक्षि-चें रूपांतर आख व दधि-चें दहीं असें होतें; त्यांतहि अंत्य ह्रस्वास फांटा मिळतो. राहतां राहिले कवि, धेनु व भानु-हे तीन प्रकार. हेहि आपण उच्चारांत दीर्घ करितोंच. यथोच्चार लेखन हें तत्त्व पाळणें तर त्यांचीं रूपें कवी, धेनू, भानू अशीं दीर्घान्तच लिहिलीं पाहिजेत. याच क्रमप्राप्त गोष्टीस पोषक अशा कांहीं गोष्टी सांपडल्यास पाहूं.

**३ संस्कृताची अनुकूलता**—शक्ति, पद्धति, धमनि, रात्रि, शकटि, ओषधि, अंगुलि अशा स्त्रीलिंगी ( ह्रस्व ) इकारान्त रूपांचे जागीं संस्कृत व्याकरण ' आक्तिन्नर्थाद्वा ङीष् ' इत्यादि वचनांनीं दीर्घान्त रूपांचा विकल्प उपदेशितें. अशा रीतीनें अंत्य स्वराचे दीर्घीकरणास संस्कृत व्याकरण सर्वथा विरुद्ध नाहीं, हें स्पष्टआहे. ' स्त्रियां मूर्तिस्तनुस्तनूः ' असें अमरकोशांतील प्रतीक प्रसिद्धच आहे. यांत तनु-चे जोडीस तनू असें दीर्घान्त रूप दिलें आहे. म्हणजे दीर्घान्तत्व जेथें मुळींच प्राप्त होत नाहीं, असे प्रकार दोनच राहिले; ते कवि व भानु. इतर पांच प्रकारांत, येथें दर्शविल्याप्रमाणें, कांहीं ठिकाणीं अकार तर कांहीं ठिकाणीं दीर्घ, अंशतः वा पूर्णतः, प्रवृत्त होतो. म्हणजेच असें म्हणतां येईल कीं सातांपैकीं पांच ठिकाणीं, अर्थात् जवळ जवळ पाउण क्षेत्रांत, ह्रस्वान्ताला उघड उघड खो मिळतो. बाकी राहिलेलें एक चतुर्थांश क्षेत्र. त्याचा आतां विचार करूं.

**४ धनिन्–चा दाखला**––आपण धनिन्–चा तद्भव दीर्घान्त धनी असा कां करितों ? तो प्रथमेचें रूप आहे म्हणून. म्हणजे असें ठरतें कीं प्रथमान्त रूपावरूनहि तद्भव बनतो. हेंच तत्त्व कवि या शब्दास लाविल्यास कविः असें रूप मराठींतील रूपाचे उद्गमस्थानीं प्राप्त होतें. पण ( यांत आडळणारा ) विसर्ग तर मराठींत नसल्यासारखाच आहे. करितां तो मराठींत टिकणें शक्य नाहीं; तो लोपला पाहिजे. पण तो लोपतांना मागील स्वरास दीर्घत्व देणार. स्वर् + राज्य यांतील र् लोपतांना तो मागील स्वरास दीर्घत्व





देतो; व तेथें स्वाराज्य असें रूप बनतें. संस्कृतांत सामान्यतः असा नियमच आहे कीं, द् र् हीं व्यंजनें लोपल्यास्, तीं यथासंभव मागील स्वरास् दीर्घ करितात. मराठींतहि सर्प-चें साप, यासारख्या उदाहरणांत हीच प्रवृत्ति आढळते. तीच येथें विसर्गास लाविल्यास-विसर्ग झाला तरी व्यंजनच आहे-कविः-चें मराठी रूप कवी प्राप्त होतें; याच विचारसरणीनें भानू धेनू अशीं दीर्घान्त रूपें मराठींत योग्य ठरतात.

**५. अंत्य ईकाराविषयीं थोडासा आनुषंगिक विचार**—समसन (=समासरचना) व विभजन (=विभक्तिग्रहण) या दृष्टीनें मराठींत इ-वर्णान्त नामें त्रिविध आढळतात. (पति=) पती, (धनिन्=) धनी, व तेली. पैकीं तेली-चें मूळरूप दीर्घान्त व अंग तेल्या असें होतें; व तो शब्द आपण नित्य तेली असा दीर्घान्त उच्चारतों व लिहितों. पति व धनिन् अशीं मूळचीं रूपें असून, पती व धन्या अशीं त्यांचीं अंगें बनतात. चालण्यांत धनिन्-चें तेली-शीं, तर समासगत पूर्वपद हे तांना पति-शीं साम्य आहे. सारांश हे तीन प्रकारचे शब्द मराठींत एकमेकांहून भिन्नपणें वागतात. तेल्या, धन्या, पती अशीं त्यांचीं अंगें बनतात. तेली, धनी, पती अशीं मूळरूपें दीर्घान्त मानिलीं तरी, समासांत पूर्वपदस्थानीं योजितांना, त्यांतील भेद दृष्टिसमोर ठेविला पाहिजे. मोरोपंत हा प्रख्यात कवी होऊन गेला'. अशा वाक्यांत अर्थातच कवी असें दीर्घान्त रूप लिहावें; मग त्यांतील मूळरूप कोणी तदभिन्न मानोत वा ह्रस्वान्त मानोत. मराठींत इ-वर्णान्त पुं०-नामांचीं रूपें पुढें दर्शविल्याप्रमाणें त्रिविध प्राप्त होतात—

| समासपूर्वपद | प्रथमान्त | विभक्ति-अंग (=सामान्यरूप) |
|---|---|---|
| कविश्रेष्ठ | कवी | कवी(नें) |
| धनिवर | धनी | धन्या(नें) |
| तेलीतांबोळी | तेली | तेल्या(नें) |

यांतील **कवि-बरोबर** शेटजी (इत्यादि जी-प्रत्ययांत शब्द), केसरिन्, शशिन्, ऋषि, मुनि, पति यति हत्ती इत्यादि शब्द, व **धनिन्-बरोबर** शास्त्रिन्, वेदांतिन्, संन्यासिन्, रत्नपारखी, सारथी, रथिन्-हे शब्द सवर्गीय होतात. सारांश, मराठींत मूळचेच, (जसें-गांधीजी, तेली) किंवा इन्-प्रत्ययान्तापासून आलेले दीर्घ-ईकारान्त (जसे-शास्त्रिन्, स्वामिन्) शब्द चालण्यांत एकविध नाहींत. असाच कांहींसा प्रकार स्त्रीलिंगांतहि आढळतो.

**६ शब्द-जात्यंतराचें साम्य**—यु-वर्णान्त अव्ययांमध्यें **आणि** व **परंतु** हीं दोनच अव्ययें, मला वाटतें, ह्रस्वान्त आहेत; बाकी सर्व अर्थात् दीर्घान्त; जसें-आधीं, कधीं, खालीं, मुळीं; तर्हि या ह्रस्वान्ताचा तद्भव 'तरी,' लघु-चा हळू, कर्तुम्-चा करूं, असा दीर्घान्त बनतो. अशा रीतीनें मराठी तद्भव अव्ययांत मूळ ह्रस्व यु-वर्णाबद्दल दीर्घस्वर प्राप्त होतो. (यु-वर्णान्त नामांमध्येंहि हा प्रकार अगदींच अपरिचित आहे असें नाहीं, अश्रु-चा तद्भव असू असा दीर्घान्त होतो. किती यांतील दीर्घस्वर ह्रस्वाचेच जागीं प्रवृत्त झाला आहे.)

**७ मराठीचें उच्चाराचें धोरण**—मधु, मधुनी, मधूनि, पठति, पठतः, पठन्ति, इत्यादि अनेक ठिकाणीं संस्कृतांत ह्रस्वान्त पदें आढळतात. तीं उच्चारावयाचीं म्हणजे जिभेस एकप्रकारचा झटकाच द्यावा लागतो. मधु इतका उच्चार झाल्याबरोबर जिभेचें नियमन करून तिला अंत्याचे दीर्घ उच्चारापासून निवृत्त करावें लागतें. एक प्रकारचा खटका किंवा खंड कांहीं संस्कृत शब्दांचे उच्चारणांत आढळतो, तसा प्रकार मराठींत नाहीं. रघु नांवाचा राजा होऊन गेला,-अशा वाक्यांत रघु-मधील उकार उच्चारून झाल्याबरोबर आपण जीभ एकदम थांबवीत नाहीं, तिला तिचे कलाप्रमाणें, उकार दीघ उच्चारूं देतों; ज्यावरून मराठी भाषा खटकी किंवा खंडनादी नसून, अनुनादी किंवा दंडनादी ठरते. ती

शब्दाचा नाद एकदम थांबवीत नाहीं, तर तो (जिभेचे सुखाकरितां) कांहीं वेळ चालू देते. ही प्रवृत्ति लक्ष्यांत घेतली म्हणजे 'राम वनांत गेला व सीताही' अशा वाक्यांत सीता-पुढील अव्ययांतील स्वर ह्रस्व उच्चारण्याचें कोणीच मनांतहि आणणार नाहीं.

८ **अस्थानीं पक्षपात**—संस्कृतांतून मराठींत येतांना कटुकी व गोक्षुर-या शब्दांचीं रूपें क्रमानें कुटकी व गोखरूं होण्यांत **स्वरविपर्यय**, गौडचें गोड होण्यांत **स्वरविकृति** व इयत्ताचें यत्ता होतांना **स्वरलोप** होतो. इतक्या गोष्टी स्वरासंबंधानें खपतात. मग केवळ अंत्य स्वराचें दीर्घत्व च कां खपूं नये? पुट-चें पूड, हिमचें हींव होण्यांत उपान्तांतहि दीर्घीभवन खपतें, मग अंतांतच कां खपूं नये? या प्रश्नास समाधानकारक उत्तर शक्य दिसत नाहीं. केवळ अंधपरंपरा हेंच कारण येथें दिसून येईल. तेव्हां अंत्य यु-वर्णाचे दीर्घत्वास प्रतिबंध करणें म्हणजे निव्वळ अवास्तव पक्षपातच होय.

९ **प्रस्तुत संबंधांतील तीन मतें**—

| | मूळरूप. | प्रथमा. | विभक्ति-अंग. |
|---|---|---|---|
| ( १ ) | कवि | कवि | कवी |
| ( २ ) | कवि | कवी | कवी |
| ( ३ ) | कवी | कवी | कवी |

अशीं तीन मतें येथें संभवतात. यांतील मध्यगत म्हणजे दुसरें मत युक्त भासतें. त्याप्रमाणें मूळ-रूप समासासाठीं म्हणून कोशांत ह्रस्वान्त वापरावें, व प्रथमान्तरूप उच्चारानुरूप दीर्घान्त करावें. अंग तर सर्वच मतांप्रमाणें दीर्घान्त आहेच.

**उपसंहार**—अशा रीतीनें मराठींत मति-चें मती, भानु-चें भानू करणें, (किंवा ह्रस्वान्त बदलणें) कसें योग्य आहे हें पटवून देण्यास येथवर सांगितलेलीं कारणें पर्याप्त आहेत असें मला वाटतें. तींच थोडक्यांत अशीं —( १ ) **मराठी भाषेची प्रवृत्ति**, जिचे योगानें ( क ) दीर्घान्तच शब्द प्रशस्त ठरतात-जसें चालू, कांहीं, भारी, नाहीं इत्यादि, किंवा ( ख ) अन्त्य स्वर ऱ्हस्व न राहतां, त्याचे ठिकाणीं केवळ अकार येतो; जसें—गत, रीत, मध, तन इ० ( २ ) **संस्कृतांतहि** अंत्य इकारास दीर्घत्व यावयाची **सवलत**, जसें—अंगुलि--ली, वीचि--वीची इ० ( ३ ) जसें धनिन्-चें **प्रथमांत रूप** त्याच्या तद्भवाचा प्रभव बनतें, तसेंच मतिचें मतिः हें रूप घेतल्यास, मराठी रूप मती असें दीर्घान्तच प्राप्त होतें. ( ४ ) तरी, हळू, इ० अनेक **अव्ययें** अंत्य ऱ्हस्वाचे जागीं दीर्घ योजतात. ( ५ ) कति-चें किती, दधिचें दहीं, अश्रु-चें असूं, यांतील **दीर्घीकरणाची** सर्वसंमत वहिवाट सार्वत्रिक केल्यास तद्भवांत येणारी एकविधता ( ६ ) पदांचे अंत्य स्वर दीर्घ उच्चारून मराठी शब्दोच्चारास मिळणारें **सौकर्य**, व शेवटीं ( ७ ) तद्भव बनतांना मूळ स्वराचे विकारापासून तों लोपापर्यंत अनेक प्रकार रूढ असतांना, अंत्याचें दीर्घीभवनहि क्रमप्राप्तच ठरतें, तसें तें होऊं न दिल्यास प्राप्त होणारा **पक्षपातदोष**—या सर्व गोष्टींचा विचार केल्यास याच सप्तविध कारणांस्तव-कवि-चें कवी, भानु-चें भानू अशीं दीर्घान्त रूपें मराठींत प्रशस्त ठरतात.

# महानुभावपंथीय वच्छहरणकाव्य

( लेखकः—प्रो. द. सी. पंगु, एम्. ए. )

वरील काव्य सटीप व सोपोद्घात प्रसिद्ध करून जवळ जवळ दोन वर्षे होत आलीं. तितक्या अवधींत त्याच्यावर अनेक विद्वानांचे अभिप्राय प्रसिद्ध झाले. यांत विशेषतः रा. रा. बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं 'विस्तारांत' केलेल्या परीक्षणाचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. मूळ वच्छहरणाच्या छापील प्रतींत पुष्कळ अपपाठ राहून गेले व मी दिलेल्या टिपांत महानुभावसांप्रदायासंबंधीं व तत्कालीन शब्दांसंबंधीं बरीच संदिग्धता असणें अपरिहार्य झालें. महंत दत्तराज कवीश्वर महानुभाव यांनीं अत्यंत कृपाळूपणानें काळजीपूर्वक वरील शंकास्थळांची निवृत्ति करून तशा प्रकारें शोध घातलेली प्रत मजकडे धाडली. त्यावरूनच उपरिनिर्दिष्ट स्थलें वाचकांपुढें मांडण्याचा विचार आहे.

प्रथमतः मूळ ग्रंथांतील ठळक पाठभेदांबद्दल व तच्छुद्धीबद्दल थोडें लिहावयाचें.

( ओंवी ११ ) न होता नवी दिशीं : अंधकारू न वचें ॥

येथें 'रवी दिशीं' असा पाठ पाहिजे. दिवसां सूर्य उगवला नाहीं तर असा प्रथमार्धाचा अर्थ होईल.

( ओंवी २९ ) जैसें अमृत नव्हे जूनें: उरंगे ना साडे पव्हर सोने ॥

'साडे पद्दर' असा शब्द असून त्याचा अर्थ ५२ कसी सोनें.

( ओंवी ५४ ) जैं दैत्या करी संहारूं : तैं बिभत्सु अणिवारू ॥

यांत "आण वीरू" असा पाठ आहे. वीररसाचा येथें स्पष्ट उल्लेख आहे. यामुळें माझ्या प्रतीच्या उपोद्घातांत यावर केलेलें विधान ग्राह्य होणार नाहीं.

( ओंवी ८१ ) हटोपरीं बाउली तोडरीं : काढती दैत्याची

'हांटकोपरीं' असा पाठ येथें आहे, व त्याचा अर्थ 'सुवर्णावर' असा आहे.

( ओंवी १३९ ) चंदनाचा आरू थोरू : माजी नीबिडु कल्पतरू.

'आरू' बद्दल 'आवारू' असा पाठ पाहिजे. कारण 'आरू' याचा कांहीं अर्थ होत नाहीं.

( ओंवी १४९ ) शरीरें अमरामरें : करीतांती.

अजरामरें असा शब्द बरोबर आहे.

( ओंवी २७१ ) अवतरलासे परमात्मा : तेथ दु:ख नाहीं भूत-ग्रामां ॥
'अवतरलासे' या शब्दामागें 'जेये' असा शब्द पाहिजे.

( ओंवी २९२ ) तें घस्पूसत आलें : परब्रम्ह देखा !
येथें 'तें घरां पूसत आलें' असा खरा पाठ आहे.

( ओंवी ३२७ ) वत्सां करितां स्थनधानु : धेनुचां न सावेर पाहुनु ॥
'स्थनपानु' असा शब्द मूळांत आहे.

( ओंवी ३६४) ब्रम्हा विष्णु महाकाळु : सकल सन्हान दिग्पाळु ॥
सन्हान याचा कांहींच अर्थ लागत नाहीं. त्याबद्दल 'साहान' असा शब्द पाहिजे.

( ओंवी ३६८ ) श्रीकृष्णांचीं नवलें कवतुकें : जो नारायणु नाभीकमळीं कूकें ।
'कूकें' याबद्दल चूकें हा शब्द घ्यावा.

( ओंवी ४५७ ) महिमेचा नेणवे पारू : तूं ज्ञानविज्ञानां दातारू.
'महिमेचा' या मागें 'तुझिये' हा शब्द मुळांत गाळला आहे. तो तेथें घालावा.

या पुढें आतां ज्या प्राचीन व कठीण शब्दांचा अर्थ मला प्रस्तुत पुस्तक प्रकाशनप्रसंगीं लागला नाहीं, तो क्रमानें देत आहे. याबद्दलचें सर्व श्रेय महंत दत्तराज कवीश्वरांना आहे, हें सांगणें नकोच. ओंवीचा आंकडा देऊनच शब्दाचा उल्लेख करीत आहे.

( ओंवी २८ ) **बैकार:**—बहिष्कार-बहिकार-बइकार-बैकार (शास्त्रबहिष्कृत) एवं पवाडे

( ओंवी ४४ ) **निशानी:**—सोपान, शिडी. आजकालहि चालू वऱ्हाडी भाषेंत शिडीस निशाणी असें म्हणतात.

( ओंवी ४६ ) **सरतेआं:**—गमन करणारे. 'सृ' गतौ पासून याची उत्पत्ति आहे.

( ओंवी ६८ ) **ओडजा:**—कौतुकभाव दर्शवितो.

( ओंवी ८५ ) **शशी सिरणें:**—हातांत हात धरून वर्तुळाकृतीनें, मग धरलेल्या हातांतून शिरणें तें. शशि = वर्तुळ तयांत शिरणें, पुनः निघणें असा खेळ.
**हुंबळी:**—नाचत दोन गाल फुगविणें आणि मुष्टयांनीं गालफुग्यावर मारणें.
**हमामा:**—वांकून पोटांत कोपर दडपणें आणि हंसणें.
**वेली:**—लांब गाणें.

( ओंवी ८३ ) **जारे दैत्य म्हो भणतु पेंढारी:**—जारे दैत्यहो. पळारे असें पेंढारी (श्रीकृष्ण) म्हणतो.

**ब्रीदें उभारतांतीं:**—"असुरनाश आणि भक्तरक्षण करण्याचें तोडर प्रसिद्ध करताती." या पादाचा संबंध गोपाळाकडे आहे.

वरील दोन्ही पादांचा अर्थ महानुभावी टीपग्रंथावरून दिला आहे.

( ओंवी ८८ ) रूंझीः—हर्ष.
( ओंवी १३० ) पुडुराः—पुरवठा.
( ओंवी १४२ ) रोवंतातीः—रंवथ करतात, (सं० रोमंथ).
( ओंवी १५४ ) उँत्तवराः—उत्कर्ष.
( ओंवी १५९ ) खेडकुळियाः—साने हौद.
( ओंवी १६१ ) दोषेंः—करितां. महानुभावीय सूत्रपाठांतहि हा शब्द याच अर्थी आला आहे. या अर्थी हा प्रयोग फार प्राचीन आहे.
( ओंवी १६५ ) आडींः—आलापयुक्त गायन किंवा पर्वतशिखरावर.
( ओंवी १७७ ) केवाळुः—बारीक वाळु.
( ओंवी १७८ ) ठीकलग—अलंकार.
( ओंवी १८१ ) ढोंकः—पक्षीविशेष.
( ओंवी २१६ ) रळिया रापदळियाः—बोलणें व शरीरचेष्टा.
( ओंवी २१७ ) आडपडतुंः—हांसे आवरेना म्हणून आडवें पडत होते.
( ओंवी २२४ ) मालगंठीः—मल्लास दृश्य गांठ देऊन कासोटा घालणें (सं० मल्लग्रंथी)
( ओंवी २२६ ) सांभववेधुः—विश्वचैतन्याची विद्या—हा सांप्रदायिक अर्थ आहे.
( ओंवी २३६ ) तढेंः—तटस्थता, साभिनिवेशदृष्टि.
( ओंवी २६८ ) साहानुकः—सांप्रत.
( ओंवी २८० ) दूधवडीचीः—दूधवड देशाची करडी कांबरी.
सोनेखैरीः—पीतवर्णी.
रोदेचीः—रोद देशाची सोनेखैरी.
भांगारीः—तांबडे पांढरे ठिपक्यांनीं युक्त.
तेजाथिलीः—तेजोमय.
( ओंवी २८१ ) मोहरींः—तोंडावर पांढरी.
पारडीः—मलिन वाणाची.
पुंडीः—शुभ्र मुख असून पीतवर्णी.
देशसायाः—माळवी, सोरठी.
( ओंवी २८२ ) जाऊपेंः—वत्स
( ओंवी २८५ ) तारसेंः—तिरकस डोळ्याचें.
भुरळेंः—उलट्या बाहुल्या असलेल्या डोळ्याचें.
पींगळेः—पिंगळ्यासारख्या डोळ्याचें.
( ओंवी ३०९ ) सहवाणुः—पादतल वासणें.

( ओंवी ३११ ) **उपहौडलें**:—उठिलें. ( पहा० भावे-व्यासकृत पूजावसर )

( ओंवी ३१४ ) **नागारी**:—कीर्तिपाठक.

( ओंवी ३२३ ) **शांभवादिक**:—सांप्रदायार्थः - चैतन्यमायेपासून शेवटील यक्षणी-पर्यंत अनंत शक्तिदेवतांसमूह तिया मूर्तिमंतां सेवका.

( ओंवी ३६४ ) **सहान**:—सैन्य.

( ओंवी ३३६ ) **दाखाळा**:—पडताळा. हा शब्द कवीश्वराचार्यकृत शिशुपाळवधांतहि आला आहे. पहा ओंवी ३३२. कवीश्वराचार्य व पंडित दामोदर हे समकालीन असल्यामुळें हा शब्द मुसलमानी ठरूं शकत नाहीं. ११९५ मध्यें कवीश्वराचार्यांनीं हा शब्द प्रयुक्त केला.

( ओंवी ३७० ) **हाटकेचें अग्निस्तंभन**:—हीं रामायणांतील कथा आहे.

( ओंवी ३८५ ) **फडतरीं**:—फोडी. कापण्या

यावरून या काव्याच्या वाचकांना व अभ्यासकांना पुष्कळ मदत होईल. शब्दांचाहि उहापोह करण्यास सोइचें होईल. वरील अर्थ मुख्यतः महानुभावपंथीय टीप-ग्रंथांतून घेतल्यामुळें ते प्रमाणभूत असेच आहेत. मूळग्रंथावरून ताडून पाहण्यास मात्र विनंति आहे.

---

# शब्दसंग्रह

## कोंकणांतील लोहारकामाचीं हत्यारें

आमच्या दक्षिण कोकण प्रांतांत–विशेषतः रत्नागिरी तालुक्यापासून दक्षिणेकडे सुतार [म्हणजे लाकडीकाम करणारे] व लोहार किंवा ल्हार [म्हणजे लोखंडी–कुदळी, कुऱ्हाडी, कोयत्या, खिळे, वगैरे–घडकाम करणारे] हे एकच–म्हणजे दोन्ही प्रकारचीं कामें करणारी व्यक्ति एकच-असतात. ह्यांच्या विशेषनामापुढें ओजा किंवा वजा हें विशेष [उप किंवा जातिवाचक] पद योजिलेलें आढळतें. जसें:—हरवजा–हरौजा, सखवजा–सखौजा, गणवजा–गणौजा, इ० ह्या कारागिरांच्या लोखंडी घडकामाकरितां लागणाऱ्या हत्यारांविषयीं कांहीं माहिती:—

जागा:—हे कारागीर लोखंडी घडकाम आपल्या राहत्या घरांत न करितां निराळ्या खोपटींतच करितात; त्या खोपटीस साळ म्हणतात.

हत्यारें:—१ हरण (ऐरण) ही बरीच मोठी असून न हालेशी जमिनींत पुरलेली असते.

२ हातवडा–हातोडा–हे लहान व मोठे असे असतात.

३ घण–हा प्रत्यक्ष घडकाम करणाऱ्याखेरीज दुसऱ्या माणसानें जोरानें ठोकावयाचा.

४ सांडशी—जळजळीत तापलेलें लोखंड ऐरणीवर धरण्याकरितां. ह्या हत्याराचे २ प्रकार

(अ) बिन नेढयाच्या कामासाठीं सरळ टोकाची–सोनाराच्या गावीप्रमाणें

(आ) कुदळी वगैरे नेढयांच्या कामासाठीं वाकवलेल्या टोकांची

५ ढाणी—लांब व जाड सळई. प्रकार २

(अ) वाकवलेल्या टोकाची–निखारे सारण्यासाठीं वगैरे

(आ) सरळ टोकाची–कोयत्या वगैरेंच्या थर्वीस भोकें पाडण्यासाठीं

६ शेणी—लोखंड तोडण्याचें हत्यार.

७ वलवती—निखाऱ्यावर पाणी मारण्याकरितां वगैरे

८ लोळी—कुदळी वगैरेंचीं नेढी करण्यासाठीं

९ चुबकें—इतर भोकें पाडण्यासाठीं

१० दोणी—पाणी ठेवण्यासाठीं



अनुक्रमणिका

११ कानस—ह्या लहान मोठ्या पुष्कळ प्रकारच्या
१२ भाता—याचे अंगभूत–१ भिनाड–हें मोठ्या चुलीप्रमाणें. २ खांबण्या २. ३ पोळ्या–दोन खांबणांच्यावर बसविलेला आडवा दांडा. ४ साखळी. ५ दांडी. ६ दोरी.
१३ बीड—तापवलेलें मोठें लोखंड ठोकण्यासाठीं ऐरणीऐवजीं जो मोठ्या आकाराचा ठोकळा वापरतात तो.
१४ घासकट—कानशीनें धार काढतांना धार काढण्याचा पदार्थ घट्ट धरण्याचें गावीसारखें लांकडी हत्यार.

कृष्णाजी गोविंद साठे

---

## सोनार कामाचीं हत्यारें व त्यांचीं नांवें

(हत्यारांचीं जीं नांवें नेहमींच्या प्रचारांतील आहेत त्यांचा उपयोग काय याबद्दल खुलासा केलेला नाहीं. परंतु जीं नांवें फारशीं प्रचारांत नाहींत व नुसत्या नांवावरून ज्यांचा उपयोग काय हें समजत नाहीं त्या बद्दलचा खुलासा हत्यारांचे नांवापुढें केलेला आहे.

१ ऐरण
२ हातोडा
३ सांडस, सांडशी
४ पाईत (मोठें कुंड)
५ वागेश्वरी (सोनार लोकांचे कुळस्वामिनी वाघेश्वरी हिचे नांवावरून)
६ जंतरपट्टी (लोखंडाची बारीक भोकें असलेली पट्टी, हिच्या भोंकांतून तार बारीक करण्याकरितां ती ओढतात)
७ गाव्हा.
८ गावी
९ ओतणी अथवा पडघणी (धातूचा रस झाल्यावर तो निवण्याकरितां ओततात ती)
१० बरताणा, काकघा, श्रृंगारपुतळा, (बांगड्या, कडी, पाटल्या वगैरे दागिनें यांस बांक आला असतां तो काढण्याकरितां ज्या ठोकळ्यावर ठोकतात तो)
११ करडे पट्टी
१२ ब्मे
१३ वटंग, खुऱ्या
१४ भाता
१५ दडणी, पोगर, इंवणी (नकशीचीं बारीक हत्यारें)
१६ बेतू (खणाची पेटी)
१७ घरटाळे (काटा ठेवण्याची पेटी)
१८ मांडणी
१९ कंपास
२० सवाणा
२१ पावटा व पुसर (तार ओढण्याकरितां वापरतात तो चिमटा)
२२ करळ (फुलाचे ठसे)
२३ दाबे अगर काजवे (मासोळ्याचे ठसे)
२४ मुसा
२५ कानस
२६ राळपाट
२७ सळ (सोन्याची लगड)
२८ कुंडी, कोटंबी, (सोनें तापविल्यावर विझवण्याचें भांडें
२९ रोगरे (वेळा पिळण्याचा चिमटा)

## घरासंबंधीं शब्द

१ घर, २ वास्तु, ३ वाडा, ४ मठी, ५ इमला, ६ इमारत, ७ झोपडी–डें, ८ झाप, ९ आवसा, १० गुहा, ११ गुंफा. माणसें राहतात त्या वास्तूला हीं नांवें आहेत.

१ गोठा, २ वेडें, ३ वाडा, ४ पडळ. गुरें रहण्याकरितां बांधलेल्या वास्तूंचीं नांवें.

१ छप्पर, २ खेपट-टें, ३ खोप. लाकूडफाटें ठेवण्याकरतां बांधलेल्या वास्तूंचीं नांवें

१ सोपाः—हा घर, गोठा आणि छपर या तिहींचें काम करतो.

१ कोठारः—धान्य ठेवण्याची वास्तु.

१ कोठीः—धान्यादि संग्रहाची घरांतील खोली.

१ वखारः—माल ठेवण्याची वास्तु.

१ मांडव.

१ माळा–ळीः—शेत राखण्याकरतां उभारलेली वास्तु.

१ घरटाः— पडक्या घराची जागा.

पाख्यांच्या संख्येवरून घरांचे प्रकार होतात तेः-

१ एक मोळी; एक पाखी; २ दुमोळी, दुपाखी; ३ चौमोळी, चौपाखी

घराच्या तळमजल्याच्या वठाणांवरून होणारे प्रकार

१ एकघई; २ दुघई; ३ तिघई.

माजघराच्या दोन्ही बाजूस ओटया असतात तें घर तिघई; एकाच बाजूस ओटी असेल तर दुघई, सोपा एकघईच असतो.

### घराचे भाग

१ जोतेंः—प्रकार १– चिरेबंदी, २ माठीव, ३ टिचीव, ४ सडकीव

सडकीव = टांकी लावलेल्या दगडांचें

टिचीव = बारीक दगडांचें

माठीव = टांकी लावून छिनीनें घडवलेल्या दगडांचें

जोतें–चिऱ्यांचें, बिन घडलेल्या दगडांचें किंवा तोडांचें असतें. शिवाय जोत्याचा शेवटला थर पुढें आलेला असला म्हणजे त्याला पेटीचें जोतें म्हणतात.

तोड = खांडकी.

गुंड = मोठा दगड.

बेंद्री = एक बाजू ज्याची घडलेली आहे असा दगड.

पाणभरा = दोहों बाजूंनीं घडलेला दगड. हा जोत्याच्या शेवटल्या थराला लावतात.

## जोत्यावरील इमारतीच्या मालमसाल्याचे शब्द

१ उथळें, २ खांब, ३ जोट, (जोड?) [खांबावर आणि लगीखालीं], ४ लग, ५ फडदा, ६ तोंडकडी, ७ बहाल, ८ कडी, ९ अंधेरी (अ. अंधेऱ्या) [दोन कडयांच्यामध्यें बहालाच्या बाजूस मारतात ती फळी] १० कडीपाट,

११ तक्तपोशी, १२ आडें-ढें आटण, १३ मोरवा-वी (पोटमांडणीचे खांब) १४ पोट मांडण, १५ सर, वामा, १६ वचे (लहान वासे), १७ वगीक, १८ ओनण, १९ मोटपान, चिमणपट्टी, दर्शनीपट्टी, पानपीठ. मोटपानाला चिमण्या लावल्या म्हणजे त्याला चिमणपट्टी म्हणतात.

छप्पर = कौलारू; कैंबळी अथवा मगडी. धावें.

कोपऱ्यावरच्या वाशाला कोनवास म्हणतात.

कोनवाशाला कलश असतो.

मध्यभागीं वासा मारतात त्याला टाळें म्हणतात.

## घराच्या भागांचे शब्द

१ स्वयंपाकघर, तळघर, माजघर, देवघर, वठाण, ओटी, खोली, पडवी, माडी, मजला, माळा, माळवद, पोटमाळा,

पाखें— खरपाखें = फार ढाळाचें

शीतळ पाखें, = कमी ढाळाचें

भिंत, कोनडा, गोखला; खुंटी, जिना, दरवाजा, खिडकी, फडताळ.

झारोखा = मडकें किंवा तांब्या पुरलेला कोनाडा

खांबावर संस्कार करतात ते—गोळर्चा, गलथा.

गिलावा. पागोळी

१ गोखला म्हणजे कोनाडा

ना. गो. चापेकर

---

# स्त्रियांच्या म्हणी

( अंक दोन वरून पुढें चालू ) माझ्या भगिनी श्रीमती बाळूताई खानवेलकर यांच्या तोंडून ऐकलेल्या म्हणी.

(४६) अति उदाला खाज नाहीं, अति ऋणाला लाज नाहीं

(४७) आचार भ्रष्टी, सदा कष्टी

(४८) ऊठ ग कळी, बैस माझ्या नळी

(४९) कुडी तशी पुडी

(५०) गळ्यांत नसावी सरी, पण घरांत असावी मोरी

(५१) घरोघरीं त्याच परी, सांगेना तीच बरी

(५२) सोनें मिळतें, पण तान्हें मिळत नाहीं

(५३) पुरेना माझ्या गारीं ( पोटाला ), तेथें आले मागतेकरी

(५४) माझें घोडें, जाऊं द्या पुढें

(५५) लाडाचा किडा, शेजाऱ्यास पिडा

(५६) आली भेटीला, धरली वेठीला
(५७) भरला माझा दरा ( पोट ), सगळा गांव बरा
(५८) पडो झडो, माल वाढो
(५९) कधीं नवत, कोंबडीला गवत
(६०) एक दाणा दोन फोडी, खाणाराची खोड मोडी
(६१) रागाचें रायतें, उशाचें पायथें
(६२) कळेना वळेना, माजी भाकरी गिळेना
(६३) हात पाय लुले, तोंड चुरचुर बोले
(६४) पोटांत मंद, कपाळास गंध
(६५) हौस बडी, खर्ची थोडी
(६६) झाकलें माणिक, गुण आणिक
(६७) सोंवळी गऊबाई, ओंवळ्यानें तुकडे खाई
(६८) संध्यामंद्या कोकस्नान, शिळ्या भाकरीचें निसंतान
(६९) पोळीला आणि चोळीला कोणी लहान नाहीं
(७०) धडम धाडवा, अवसेचा पाडवा
(७१) राजा राज्य कमावी, दुबळा झोंप गमावी
(७२) नागडणापाशीं उवंड गेलं, सगळ्या रात्रीं हिंवानें मेलं
(७३) बसेल तो फसेल, फिरेल तो चरेल
(७४) घरदार कुथंगळू, कणगीला पडलं बिळू
(७५) देणं ना घेणं, हळहळ ( वारंवार ) येणं
(७६) पुरुषाचें मरण शेतीं, बायकोचें वेतीं
(७७) गळां नाहीं सरी, सुखें निद्रा करी
(७८) कुठें जाशी भोगा, तुझ्यापुढें उभा
(७९) अठरा नखी खेटरं राखी, वीस नखी घर राखी ( कुत्र्याविषयीं )
(८०) खायला न खरवडायला, मशालजी रगडायला
(८१) सांवळें दाट, अर्धा बाट
(८२) अगोदर शेणमाती, मग पोळीपाती
(८३) टामणटिका ( थाटमाट ), डोक्यांत लिखा
(८४) सांगणें तें सांगणें, वडाला नेऊन टांगणें
(८५) धान्य तेथें घुशी, निधान तेथें विवशी ( जखीण )
(८६) चव ना ढव, खादाडा पोटभर जेव
(८७) नवल विपरीत, कांदा झिपरीत
(८८) माझें मी नावाजी, वोडें धरा भाओजी

नीळकंठ शंकर नवरे.

# गोमंतकीय कोंकणी भाषेंतील कांहीं म्हणी

( सं. नारायण भास्कर नाईक, संपादक 'भारतमित्र', रिवण–गोवा )

| कोंकणी | मराठींतील अर्थ |
|---|---|
| १ घरा सारको सोयरो | १ घरासारखा पाहुणा |
| २ वारें येता तशें सूप दिवचें | २ परिस्थितीप्रमाणें वर्तन करावें |
| ३ आंधळ्या मुकार नाचलो आनी भैऱ्या मुकार गायलो सारखेंच | ३ आंधळ्या पुढील नाच व बहिऱ्या-पुढील गाणें सारखेंच |
| ४ सुण्याची शेंपडी नळ्यें घाली म्होण्ण नीट जायना | ४ कुत्र्याचें शेंपूट नळींत घातलें तरी सरळ होणार नाहीं |
| ५ घाणींतल्यान वचनें पोण्ण दिवाणांत-ल्यान वचनय | ५ घाणींतून गेलेलें क्षणभर चांगलें, परंतु कोर्टाची पायरी चढूं नये |
| ६ गरजेवंताक अकल ना | ६ गरजू माणसास प्रसंगीं मानहानी सहन करावी लागते |
| ७ दैव वतरीच दशा वता | ७ नशीब फिरल्यावर चित्तवृत्तीहि बिघडते |
| ८ उपाशागेर शेळें खंचें ? | ८ उपवाशाच्या येथें शिळें कुठचें मिळ-णार ? |
| ९ वाजता थंय नाचता | ९ वादन चालल्या ठिकाणींच नाच सुरू असतो |
| १० बुद्ध आशिल्या भांडवल नाका | १० बुद्धिमानास भांडवलाची जरूर नसते |
| ११ राजान नागैल्यार आनी पावसान भिजै-ल्यार कोणा सांगतलो ! | ११ राजानें लुटल्यास व पावसानें भिज-वल्यास कुणाकडे फिर्याद न्यावयाची ! |
| १२ मोडक्या पायांक पिंजकी व्हाण | १२ मोडक्या पायाला फाटका जोडा |
| १३ कृपणाक दुणो खर्च | १३ कृपणाला दुप्पट खर्च |
| १४ भाकरी आसा ताका चाकरी नाका | १४ भाकर असलेल्याला चाकरीची जरूर नाहीं. |
| १५ घोवा परस बायल मोठी आनी का-णण घेवन लागली फाटी | १५ नवऱ्यापेक्षां बायको मोठी व मुसळ घेऊन लागली पाठी. |

# अभिप्राय

## शुद्धिसर्वस्वम्

प्राज्ञपाठशाळेतील अध्यापक न्यायमार्तंड लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं संस्कृतमध्यें हें पुस्तक लिहिलें आहे. सनातनधर्मप्रदीपकारांचा अज्ञान दीप निस्तेज करण्यास या पुस्तकाचा चांगलाच उपयोग होणार आहे. सनातनधर्म फक्त हिंदुपुरता नसून मनुष्यमात्राचा आहे हें लक्ष्मणशास्त्री यांनीं साधार सिद्ध केलें आहे. या मुख्य सिद्धांताचें ज्याला आकलन झालें नाहीं त्याला आमच्या धर्मशास्त्रासंबंधानें बोलण्याचा अधिकारच प्राप्त होत नाहीं. त्यांचीं सर्व व्याख्यानें व प्रवचनें निर्मूल होत. आमचें धर्मशास्त्र अखिल मानवांकरतां आहे ही गोष्ट मनावर बिंबली म्हणजे सर्व धर्मग्रंथि एकदम उकलतात. या पुस्तकांत आधाराशिवाय एकहि विधान केलें नाहीं. प्रत्येकानें शुद्धिसर्वस्वम् वाचून मग आपले धर्मविषयक मत निश्चित करावें. पुस्तकांतील विषयांची मांडणी अथवा उभारणी "सनातनधर्मशास्त्रस्य मनुष्यमात्रमधिकृत्यप्रवृत्तत्वात्" या मूलभूत सिद्धांतावर करावयास हवी होती.

गोंयकारांची गोंयाभायली वसणूक पैलें खंड मोल १॥ रु. अभिप्राय पुढील अंकीं.

## पद्यपुष्पहार भाग २ रा

रा. गजानन गोपाळ जोशी पेनशनर शाळामास्तर यांच्या या कविता आहेत. एकंदरींत जोशी यांच्या कविता सोज्वळ दिसतात. भाषा शुद्ध आहे. "आपलें" या सारखा शब्द अपवादात्मकच म्हणावयाचा प्रो. पाटणकर यांची प्रस्तावना गुणदोषविवेचक आहे पुस्तकाची किंमत ६ आणे.

भारत इ. सं. मंडळ त्रैमासिक आषाढ ते भाद्रपद श. १८५० या त्रैमासिकांतील माहिती नेहमींच महत्त्वाची असते. जुनें बरेंच लेख शिल्लख राहिले आहेत ते आधीं काढावे.

## सीताचरित्र

सौ. सरस्वतीबाई गाडगीळ यांनीं हें सीतेचें चरित्र शुद्ध, सरळ व सोप्या भाषेंत लिहिलें आहे. किं. ८ आणे. मुलांमुलींनीं अवश्य वाचावें.

## मातृसेवा

ही पौराणिक कादंबरी म्हणजे महाराष्ट्र-कुटुंब मालेचें १३ वें पुष्प आहे. इतर पुष्पांप्रमाणेंच हें हृदयंगम आहे. किंमत १ रुपाया.

मधुसम्भार-साहित्य-स्नेह-मंडळाचें पहिलें पुस्तक. अभिप्राय मागाहून.

## श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांचा अन्योन्य संबंध

धुळ्याचे श्री. भास्कर वामन भट यांनीं राजवाडे-संशोधन-मंडळातर्फे "श्रीसमर्थ रामदासस्वामी आणि श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांचा अन्योन्य संबंध" या विषयावर एक प्रबंध लिहून नुकताच प्रसिद्ध केला आहे. नांवावरून विषयाचें स्वरूप सहज समजण्यासारखें आहे. या निबंधांत श्री. भट यांनीं रामदासस्वामींची व शिवाजीची भेट शके १५६७ सालींच झाली असें पूर्णपणें सिद्ध केलें आहे. शके १५९४ सालापूर्वीं या दोघा असामान्य विभूतींची भेटच झाली नव्हती असें ज्यांना वाटत असेल त्यांना ऐतिहासिक दृष्टीच आलेली नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. रामदास व शिवाजी या महाराष्ट्रांत दोन अद्वितीय व्यक्ति झाल्या. दोघेहि समकालीन होते. उभयतांचें कार्यक्षेत्रहि जवळ जवळच होतें. अशा ह्या थोर माणसांची परस्परांस कित्येक वर्षेपर्यंत ओळखहि नव्हती असें प्रतिपादन करणारे विद्वान शिवाजीला कमीपणा आणूं पाहतात. अथवा रामदासांकडे शिवाजीचें लक्ष जावें असें या स्वामींत कांहींच नव्हतें असें ध्वनित करण्याचा रोखहि कदाचित या विद्वानांचा असावा. तरी सुद्धां ऐतिहासिक दृष्टि या मंडळींत नाहीं या म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय येत नाहीं. इतर संतांपेक्षां रामदासस्वामींत कांहीं निराळें नव्हतें असें सूचित करणें हा एक अनैतिहासिक दृष्टीचा मासलाच आहे. बरें असेंहि मानलें कीं इतर संताळ्यांतच रामदासांची गणना होत असे, तरी सुद्धां तुकारामाचें दर्शन घेणारा शिवाजी रामदासांस तेवढा भेटणार नाहीं हें म्हणणें त्यावेळच्या धर्मसमजुती मनांत आणतां अविचाराचें होय. एकवचनी, एकपत्नी असा क्षत्रिय वीर जो श्रीराम आणि एकनिष्ठ व अचाट शक्तीचा जो हनुमान यांची उपासना सुरू करणें, ठिकठिकाणीं मठ स्थापून महंत नेमणें व त्याच्या द्वारें "आणवेन घेती चहूंकडील वार्ता". या गोष्टी रामदासांचें वैशिष्ट्य निर्विवाद रीतीनें सिद्ध करतात. त्या स्वराज्यस्थापनेच्या कामीं मग्न झालेल्या शिवाजी राजाला उपकारक झाल्या नाहींत असें मानणें हास्यास्पद आहे. सर्व प्रकारच्या गुप्त बातम्या ठिकठिकाणांहून आणणाऱ्या भगवीं वस्त्रें परिधान करणाऱ्या चारांचे संचार रामदासां करतां होते का शिवाजी करतां होते? ह्याचें उत्तर अगदीं उघड आहे.

रा. भट यांचा निबंध अत्युत्कृष्ट आहे. त्यांची ऐतिहासिक दृष्टी व्यापक आहे. कोणाहि निर्विकार बुद्धीच्या माणसाला त्यांचें विवेचन पटेल अशा कौशल्यानें त्यांनीं विषयाची मांडणी केली आहे. वाचीत असतां वाचणारावर त्यांच्या प्रमाणांचें, आधारांचें व युक्तिवादाचें सारखें दडपणावर दडपण पडत असतें. धर्मस्थापना हें शिवाजी व रामदास यांचें ध्येय. तसेंच स्वराज्य हें धर्मस्थापनेचें साधन अशी दोघांचीहि समजूत होती. म्लेंछांचें निर्दलन केल्यावांचून धर्माची प्रतिष्ठा कशी होणार? आणि म्लेंछांचें निर्दालन करणें म्हणजेच स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करणें होय. स्वराज्य मिळवणें व चालवणें हें क्षत्रियाचें कर्तव्य असल्यामुळें रामदासांनीं स्वतः बाजूस राहून आनुषंगिक मार्गांनीं

शिवाजीस सहाय्य केलें. पण प्रतापगडीं श्रीभवानी देवीची स्थापना मात्र शिवाजीला त्यांनीं करूं दिली नाहीं. हेंच हिंदुधर्माचें रहस्य. पण आजच्या अधार्मिक वृत्तीच्या महाराष्ट्राला हें मर्म पटण्यासारखें नाहीं हें पाहून वाईट वाटतें.

असो. कोणालाहि रामदास व शिवाजी महाराज यांची मुलाखत श. १५९४ च्या पूर्वी झाली असलीच पाहिजे असें प्रथमदर्शनीं वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. पण आतां श्री. भट यांनीं समर्थप्रताप व दासविश्रामधाम यांच्या आधारानें तीच गोष्ट पुराव्यानिशीं सिद्ध केली आहे. मसूर येथें रामदासानीं रामनवमीचा उत्सव प्रथमच सुरू केला त्या प्रसंगीं म्हणजे श. १५६७ सालीं शिवाजीमहाराज उत्सवास मुद्दाम गेले होते. "वंदोनि आज्ञा गेला नृपवर । बहु गांवकरी संतोषले" ही दासविश्रामधामां-तील ओवी पुराव्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. तसेंच कऱ्हाड व मसूर येथील देशमुखी वतनाची हकीकत श्री. भट यांनीं वर्णिली आहे तीवरून स्वामींच्या हाल-चाली शिवाजीराजांच्या स्वराज्यस्थापनेला कशा सहाय्यकारक होत्या हें निदर्शनास येतें.

दिल्लीहून परत आल्यावर शिवाजीनें रामदासांना गुरु केलें त्या भेटीचें वर्णन करून दासविश्रामधामकर्ते लिहितात कीं शिवाजीमहाराजांना गुरूचें विस्मरण झालें. "विषयअभ्यासीं विसर पडे । रजतमत्रयराजा कीं ।" पुढें "भागवतींचें गुरुमहिमान" श्रवण करीत असतां राजा "प्रस्तावला". तत्काल शिवाजीराजे रामदासांच्या भेटीस गेले, व "मी अन्याई टेकोनि कामा । विभवभ्रमानें विसरलों तुम्हा" असें म्हणून क्षमा मागितली (क्षमोनि कीजे जी सनाथ). याप्रमाणें निरनिराळ्या वेळच्या भेटींचीं वर्णनें दासविश्रामांत आढळतात.

असो. रा. भट यांच्या परिश्रमानें ह्या रामदास शिवाजीवादाला कायमची मूठ-माती मिळेल अशी आशा आहे. खरा लोकनायक जो असतो त्याची नजर राष्ट्रांत कोण काय करीत आहे, कोणामध्यें किती कर्तृत्व आहे इकडे सदैव लागलेली असते. कारण अशा सर्व माणसांचा उपयोग त्याला करून घ्यावयाचा असतो. रानडे व टिळक यांची अशी नजर असे. त्यांच्या मागें अशा दृष्टीचीं माणसें महाराष्ट्रांत राहिलेलीं नाहींत. द्वेष, मत्सर व स्वार्थलोलुपता या मनोविकारांनीं ग्रस्त झालेल्या आजच्या महाराष्ट्राला शिवाजी व रामदास हे अखेर अखेरपर्यंत परस्परांस नांवानें वा दृष्टीनेंहि परिचित नव्हते असें वाटणें योग्यच आहे. ही कलुषित दृष्टि निवळली नाहीं तोंपर्यंत इतिहास विकृत स्वरूपांत जगापुढें येणें स्वाभाविकच आहे. एकंदरींत पुस्तक संग्राह्य आहे. पुढल्या आवृत्तींत रा. भट यांनीं या निबंधाला नकाशे जोडून त्यांत रामदास व शिवाजी यांच्या हालचालींचीं स्थळें नमूद करावीं. नकाशांच्या योगानें समजूत तत्काळ पडते. पुस्तकाची किंमत १ रुपया आहे.

मा. गो. चाफेकर

---







# परीक्षण

## ऐतिहासिक पोवाडे

( लेखक—ना. गो. चापेकर )

**वाणी ममैव सरसा यदि रञ्जयित्री न प्रार्थये रसविदामवधानदानम्**

वरील नांवाचें पुस्तक रा. यशवंत नरसिंह केळकर यांनीं संपादिलें असून तें होळकर सरकार पुस्तकमाला व भा. इ. सं. मं. पुरस्कृत ग्रंथमाला या दोन मालांत गुंफलें गेलें आहे. एकच पुष्प दोन मालांत गुंफण्याची अजब कला संपादन करणाऱ्या माला-कारांच्या चातुर्याची तारीफ कोण करूं शकणार! तथापि ही गोष्ट ग्रंथकाराच्या कृतीच्या कौतुकाचें निःसंशय द्योतक होय. स्वकीय गुणांत ज्या पित्रार्जित गुणलैकिकाचें मधुर मिश्रण होऊन श्री. यशवंतराव यांस यशोधनाचा लाभ झाला त्या पैत्रिक शक्तीचें विस्मरण चिरंजीव ग्रंथकारास झालें नाहीं ही अत्यंत अभिनंदनीय गोष्ट होय.

ह्या पुस्तकांत एकंदर ५२ पोवाडयांचा संग्रह केला आहे ( ३९ व्या पोवा-ड्यापासून आंकडे चुकले आहेत ) व या सर्व पोवाड्यांना भरपूर टिपा दिल्या आहेत. रा. शाळिग्राम यांनीं पोवाडयांचा संग्रह केला. परंतु संशोधनाचें काम आजवर कोणीं केलें नव्हतें तें महाप्रयासाचें व जिकिरीचें काम श्री. यशवंतराव यांनीं केलें आहे. वस्तुतः "ऐतिहासिक पोवाडे" ही शाळिग्रामांच्याच पोवाडयांच्या पुस्तकाची सुधारलेली आवृत्ति होय. परंतु "शाळिग्राम शितुतांनीं जमविलेली सर्व सामुग्री उपलब्ध झालेली असूनहि उपयुक्त ठरत नाहीं" या विचारानें श्री. केळकर यांनीं हें स्वतंत्र पुस्तक म्हणून छापलें आहे.

पुस्तक अत्यंत उपयुक्त आहे. सामान्य जनांना वेदांतील तत्त्वें समजून देण्या-करतां ज्याप्रमाणें इतिहास–पुराणें अस्तित्वांत आलीं, प्राकृत जनांना गीतेंतील गूढ उकलून निवेदून करण्याकरतां ज्याप्रमाणें ज्ञानेश्वरीचा अवतार झाला त्याचप्रमाणें अज्ञ जनांना राष्ट्राचा व राष्ट्रपुरुषांचा इतिहास आणि चरित्रे हीं ज्ञात करून देण्याच्या बुद्धीनें पोवाडयांची रचना करण्यांत आली. म्हणून इतिहासपुराणांचा जो संबंध वेदाशीं तोच संबंध पोवाडयांचा इतिहासाशीं आहे. समाजाच्या रंगेलपणांत लावण्या उदयास येतात तर राष्ट्राच्या पराक्रमकालांत पोवाडयांची निपज होते. वेद व पुराणें आणि इतिहास व पोवाडे यांचें साम्य बावनकशी आहे असें नाहीं. वेद व पुराणें यांच्या भाषेंत जितका भेद आहे तितका ऐतिहासिक बखरी आणि पोवाडे यांच्या भाषेंत नाहीं. तसेंच पोवाडे व बखरी यांत कार्यकारणभावहि नाहीं. पोवाडयाची निर्मिति बखरींच्या अगोदरची आहे. तथापि कार्यदृष्टीनें पहातां पोवाडे व पुराणें यांत बरेंच साम्य आहे. शिवाय हेंहि

विसरतां कामा नये कीं पोवाडे रचणारे शाहीर अशिक्षित असत. व्युत्पन्न ब्राह्मण शाहीर अपवादादाखलच समजले पाहिजेत.

पोवाडयाचा खरा व मुख्य विषय म्हणजे शौर्यकथाच होत. लावण्या मुख्यत: जशा शृंगारपर तसे पोवाडे मुख्यत्वेंकरून वीर्यपरच असले पाहिजेत. महाराष्ट्रांत तमासगिरांचा उपयोग शिवाजीनें राष्ट्रकार्याकडे करून घेतल्यामुळें लावण्यांच्या ऐवजीं किंवा लावण्यांबरोबर पोवाडे रचले गेले. छिनालगीतांचें स्थान वीर्यगीतांनीं पटकावलें. ही विचारसरणी जर बरोबर असेल तर शिवाजीच्या काळचे पोवाडे तुरळकच असणें संभवनीय दिसतें. पोवाडयांच्या जातीचें वाङ्मय इतर भाषांतून आहे कीं नाहीं याची चौकशी करून असल्यास त्या वाङ्मयाशीं महाराष्ट्रीय पोवाडयांची तुलना पुनरावृत्तींत करण्याची संधि दवडूं नये अशी ग्रंथकर्त्यास सूचना कराविशी वाटते. कारण श्री. केळकर यांनीं एतद्विषयक पात्रता प्रस्थापित केली आहे. कोणतेंहि पुस्तक हातांत घेतलें कीं ग्रंथकार हा पुस्तक लिहिण्याला अधिकारी आहे कीं नाहीं हें तात्रडतोब कळून चुकतें. अनधिकारी पुरुषानें रचलेला कचऱ्याचा ढीग विखुरतांना टीकाकाराला त्या ढिगाच्या घाणीचा आस्वाद लोकांस द्यावा लागतो. अशा कृतींत रचनादोष असंख्य असतात. किंबहुना आब्रह्मस्तंभपर्यंत सर्व सृष्टि दोषमयच असते. चुकूनच कोठें रत्न चमकलें तर चमकावयाचें. उलट अधिकारी पुरुषाच्या कृतींत कितीहि दोष काढले तरी त्या कृतीचा पाया व रचना हीं शुद्ध असतात. त्यामुळें त्यांतील दोषांचें स्वरूपहि वेगळ्या जातीचें होतें. या दोषाविष्करणानें वाचणाराला नाकावर रुमाल धरावा लागत नाहीं. तात्पर्य टीकाकाराचें आद्य कर्तव्य हें कीं त्यानें ग्रंथकार अधिकारी आहे कीं नाहीं हें प्रथम ठरविणें. या दृष्टीनें विचार करतां मला असें वाटतें कीं (साहित्यपत्रिकेचा संपादक या नात्यानें मी हें परीक्षण करीत नाहीं: माझा स्वतःचा अभिप्राय साहित्यपत्रिकेंत मी प्रसिद्ध करीत आहें म्हणून एकवचनी प्रयोग वापरला आहे) श्री. केळकर हे अधिकारी लेखक आहेत. हे पुढें पाणीदार व ओजस्वी लेखक होतील यांत बिलकुल संदेह नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि मोठ्या माणसाच्या प्रथमकृतीशीं ताडून पाहिला तरी यशवंतरावांचा हा पहिलाच प्रयत्न रेसभरसुद्धां कमी दर्ज्याचा ठरणार नाहीं. विषयाशीं तादात्म्य, आकलनशक्ति व योग्य भाषेंत आपलें मनोगत निवेदन करण्याची शैली इतके गुण अंगीं बाणलेले असले म्हणजे लेखनाधिकार सिद्ध होतो. रा. केळकर यांनीं पोवाड्यांच्या वाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास केला आहे व त्यांची लिहिण्याची हातोटी वाखाणण्याजोगी आहे. त्यांच्या लिहिण्यांत तडफ आहे, तशीच स्पष्टताहि आहे. विचारांचा गोंधळ उडालेला दिसत नाहीं. वाचकांना बिन आयासानें समजेल अशा रीतीनें सुसंगत लिहिणें वाटतें तितकें सोपें नाहीं. आतां अधिकार प्राप्त झाला असून ग्रंथांत दोष राहतात त्याचें कारण निष्काळजीपणा व परिश्रम करण्यांत कुचराई. त्याचप्रमाणें विषयाच्या एखाद्या अंगाविषयीं अनभिज्ञता हेंच प्रायः असतें. टीकाकाराच्या लेखणीला यामुळेंच खाद्य मिळतें. ऐतिहासिक पोवाडे वाचून माझा असा ग्रह झाला आहे कीं,

श्री. यशवंतराव केळकर यांनीं घरांत बसून कागदपत्रांच्या साहाय्यानें जितकें काहीं करतां येण्यासारखें होतें तितकें सर्व अत्यंत परिश्रमपूर्वक केलें आहे. पण तसें मंडळें नाहीं. जरूर त्या त्या ठिकाणीं जाऊन प्रत्यक्ष माहिती मिळविली नाहीं. पोवाडे संपादन करणाऱ्यानें लेखी पोवाड्यांवर विसंबून राहतां कामा नये. परंपरागत व तोंडनें म्हट- लेले पोवाडे ज्यांनीं पाठ केले असतील त्यांच्याकडून ते म्हणवून घेऊन लेखी पोवा- ड्यांशीं ताडून पहाणें जरूर होतें. उ. लेखी पोवाड्यांत संगमनेराच्या जागीं समंगनेर होणें शक्य आहे. पण म्हटलेल्या पोवाड्यांत ही चूक बहुधा आढळणार नाही. पोवाडे म्हणणारे गोंधळी आतां क्वचित् आढळतात हें खरें. पण म्हणूनच या मार्गानें निक- राचे प्रयत्न केले पाहिजेत. त्यांतहि ज्या गांवचे शाहीर त्या गांवींच त्या शाहिराचे पोवाडे ऐकावयास मिळाले तर उत्तम. नाहींतर "कांदा वांगी लागला" वाले गोंधळी अर्थाचा अनर्थ करतील यांत शंका नाहीं. संगमनेर येथील शाहिरानें रचलेला पोवाडा महाडच्या गोंधळ्याकडून म्हटलेला ऐकला कीं, "ठोकया भावेशिंग बोलला" याच्या ऐवजीं "ठोक या भावे शिंग बोलला" असेंच म्हटलेलें कानीं पडणार. पोवाडे शुद्ध करण्याचें काम किती बिकट आहे याची जर कोणाला कल्पना नसेल तर त्यांनीं या पुस्तकाचीं पानें १७ ते २३ अवश्य वाचावीं. अशिक्षित गोंधळ्यांच्या भाषेंत रचलेले पोवाडे उकलावयाचे म्हणजे प्रथम तो शाहीर ज्या जातीचा असेल त्या जातीच्या भाषें- तील विशिष्ट प्रकार समजून घेतले पाहिजेत. पुष्कळ जातींतील लोकांना र, ळ, ण यांचा उच्चार करतां येत नाहीं. या अक्षरांच्या ऐवजीं ल, ल व न हींच अक्षरें अनुक्रमें वापरतात. तसेंच अ चा उच्चार ह करतात. "आणतों"च्या ठिकाणीं "हानतों" म्हण- तात. स्त्रियांच्या तोंडीं क्रियापद पुल्लिंगी असतें. कित्येक पुल्लिंगी शब्द स्त्रीलिंगी वापर- ण्यांत येतात. अग्नि हा शब्द पोवाड्यांतच स्त्रीलिंगी वापरला आहे असें नाहीं. पुष्कळ कुळंबी लोक अग्न लावली असेंच म्हणतात. आमच्या बाजूचे कातकरी लोक तरी अग्न शब्द स्त्रीलिंगांतच योजितात. पोवाड्यांत सुद्धां "अग्न" शब्द पुल्लिंगी वापरीत नाहींत असें नाहीं. उ. "राव काढले मध्यान्ह रात्रीं दिधला अग्न" (पोवाडा १४). पोवाड्या- शिवाय लावणींतहि स्त्रीलिंगी शब्दप्रयोग आढळतो. जसें "चेतली अग्न या विषयाची" (सगनभाऊ)

केवळ पूर्वप्रसिद्ध पुस्तकांवर विसंबल्यामुळेंहि कित्येक चुका या पुस्तकांत घस- डल्या गेल्या आहेत. कोर्लईचा किल्ला रेवदंड्यापासून १ मैलावर आहे. पण या पुस्त- कांत दोहोंमधील अंतर १० मैल दिलें आहे. अर्थात् हा आंकडा गोगट्यांच्या महा- राष्ट्रांतील किल्ले या पुस्तकांतून घेतला आहे. पण तेथेंच मुद्रांत चूक झाली आहे. कदाचित् ती मुद्रणदोषहि असूं शकेल. खड्यांच्या लढाईवरील पोवाड्यांत वृक्ष, पशू आणि पक्षी यांचीं नांवें आलीं आहेत. त्यांचा बोध होण्यास रानावनांत हिंडणाऱ्या लोकांचेंच साहाय्य घ्यावें लागणार हें उघड आहे.

शिवाय मला असें दिसतें कीं पोवाडेसंपादकांचा श्रुतिस्मृति-पुराणांशीं फारसा

परिचय नाहीं. इतिहासाप्रमाणें ब्राम्हण्याला त्यांनीं जवळ केलें नाहीं. म्हणूनच भृगु व पूर्ति या शब्दांवरील त्यांच्या टिपा भलतीकडेच चुकल्या आहेत. एकाच मनुष्याला सर्व विषयांचें ज्ञान असणें शक्यच नसतें. पण हस्तलेख वाचून पाहणारांच्या लक्ष्यांत हीं दोषस्थळें यावयास पाहिजे होतीं.

असो. याप्रमाणें दोषस्थलें जरी टीकाकाराला दाखवितां आलीं तरी वर सांगितल्याप्रमाणें लेखनाधिकारांत गौणत्व येत नाहीं. अधिकारी पुरुषाचे वर्जनदोषच बहुधा दाखवावे लागतात.

आतां अधिकारी पुरुष असला म्हणजे त्यानें लिहिलेला प्रत्येक ग्रंथ पहिल्या प्रतीचा असतो असें नाहीं. ग्रंथाची योग्यता विषयानुसारी असते. स्वतंत्र विषय असेल किंवा नवीन कल्पना प्रकट झाली असेल तर तो ग्रंथ अव्वल दर्जाचा असणार. विवरणात्मक ग्रंथ दुय्यम प्रतीचे होत. पोवाड्यांचें विवरण करणारापेक्षां पोवाडे रचणारे यांना अधिक मान्यता मिळाली पाहिजे या सिद्धांतास आक्षेप कोणीं घेईल असें वाटत नाहीं. हा प्रपंच करण्याचें कारण इतकेंच कीं आमच्याकडे पुस्तकांचें परीक्षण करतांना या गोष्टींकडे दुर्लक्ष्य केलें जातें. टीकाशास्त्र अद्यापि महाराष्ट्रांत बाल्यावस्थेंतच आहे हें खरें. पण प्रत्येक टीकाकाराला या शास्त्राचीं मुख्य तत्त्वें समजणें अवश्य आहे. टीकाकार ग्रंथकाराहून खरें म्हटलें असतां अधिक अधिकाराचा मनुष्य पाहिजे. म्हणजे त्याला टीकाविषयक वस्तूचें पूर्ण ज्ञान असणें अवश्य आहे. या शिवाय लेखकामध्यें अपरिहार्य गणले जाणारे गुण टीकाकारामध्येंहि असावे लागतात. या दृष्टीनें विचार करतां "ऐतिहासिक पोवाड्यां" वर अभिप्राय देण्याची पात्रता माझ्यामध्यें नाहीं. कारण पोवाड्यांवर मी कधीं परिश्रम केले नव्हते. अभिप्रायार्थ पुस्तक कोणाकडे पाठवावे याविषयीं कांहीं धरबंदच दिसत नाहीं. अभिप्राय मागण्याचा हेतु द्विविध असतो. तज्ज्ञांच्या पसंतीचा शिक्का आपल्या ग्रंथावर मारला जावा आणि कमी अधिक असेल तें दाखविलें जाऊन ग्रंथ निर्दोष करण्यास मदत व्हावी. हा एक हेतू असून दुसरा असा कीं ग्रंथाची प्रसिद्धी होऊन पुस्तकांचा खप व्हावा. हा दुसरा हेतू वर्तमानपत्राकडे धांव मारल्यानें सफल होण्याचा संभव असतो. बाकी राहिले तज्ज्ञ. ग्रंथकाराला खरा आनंद विद्वानांचा अभिप्राय अनुकूल मिळाला तरच होतो. पण आमच्याकडे निरनिराळ्या विषयांचे सांगोपांग अभ्यासक विरळा. पुष्कळ वेळां त्यांच्या परीक्षणावरून परीक्षकांचीच परीक्षा होत असते. एकच पुस्तक पण परस्पर विरुद्ध अभिप्राय पडत असतात. एकानें अप्रतीम म्हणून पुस्तकाची शिफारस करावी तर दुसऱ्यानें तें हातांत धरण्याच्याहि योग्यतेचें नाहीं म्हणून शेरा मारावा. अधिकारी समजून अनधिकारी माणसाच्या हातांत अभिप्रायार्थ पुस्तक दिलें असतां पश्चात्ताप पावण्याची पाळी बिचाऱ्या ग्रंथकारावर यावी हें स्वाभाविक आहे. याचें ताजें उदाहरण म्हणजे "रामायणाचें समालोचन" होय. ज्यांना मराठी भाषेविषयीं आस्था वाटत असेल त्यांना या उत्कृष्ट ग्रंथाबद्दल अभिमानच वाटला पाहिजे. पण अशा पुस्तकाचे धिंडवडे काढलेले पाहिले

म्हणजे मन करवरून जातें. पण "मृष्टान्नगनं किमु गर्दभानाम्" म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. रसिकता नसेल; हें एकवार संभवतें. पण टीकाकारांनीं आणि प्रकाश-कांनीं सदभिरुचीलाहि लाथाडलें तर त्यांस काय म्हणावें हेंच समजत नाहीं. मत-भेदामुळें उसळून जाण्याचें कारण नाहीं. मतभेद हें पुस्तक नालायक ठरविण्याचें योग्य कारण नव्हे. विवेचनपद्धति शुद्ध असल्यास तें पुस्तक चांगलें म्हणणें भाग आहे. हें कांहींसें कायद्याच्या परीक्षेसारखें आहे. विद्यार्थ्यांपुढें एकादा काल्पनिक खटला ठेवतात व त्याचा निर्णय करावयास सांगतात. विवेचनपद्धति जर निर्दोष असेल तर अगदीं विरुद्ध उत्तरें देऊनहि सर्व विद्यार्थी पास होऊं शकतात. असो. या संबंधानें येथेंच थांबलें पाहिजे. अधिक विस्तार करण्याचें हें स्थळ नव्हे. सांगावयाचें तात्पर्य हें कीं अभिप्रायार्थ किंवा परीक्षणार्थ पुस्तक कोणाकडे पाठवावें या गोष्टीची ग्रंथकारास मोठी अडचण वाटते. पण प्रस्तुत कामीं ग्रंथकाराची अडचण प्रस्तुत टीका-कारालाच भासत आहे. कारण पोवाडयाच्या वाङ्मयाचें या पूर्वी मी कधीं अध्ययन केलें नव्हतें. श्री. केळकर हेच माझे या कामीं पहिले गुरु बनले आहेत. त्यांच्या या पुस्तकामुळें पोवडयांचीं सर्व पुस्तकें जमवून मी थोडीं बहुत वाचून काढलीं. मी जो अभिप्राय दिला आहे व देत आहें तो तज्ज्ञ म्हणून नव्हे हें सांगावयास नकोच.

पोवाडे हें एक इतिहासाचें साधन आहे यांत शंका नाहीं. पोवाडयांत इतिहास सांपडलाच पाहिजे. कारण ऐतिहासिक कथन हाच पोवाडयांचा ऐकांतिक उद्देश होय. तथापि अशिक्षित शाहिरांनीं ऐकीव गोष्टींवर–बाजारगप्पांवर (ते आपल्याला कोण सांगतो आतां, पुढें जे उडेल मातु, तेव्हां कळेल कीं....अनंत फंदी) विसंबून उद्दीपक भाषेंत रचलेल्या पोवाडयांत ऐतिहासिक सूक्ष्मता नसणें साहजिकच आहे. शिवाय सम-कालीन पोवाडा असला तरी तो समकालीन आहे एवढ्याच करतां त्यांत अनिष्ट, लांछनास्पद नामोसकारक गोष्टी सत्यरूपानें कथन केल्या जाण्याचा संभव कमी. पण हा सिद्धांत पोवाडयांपुरताच आहे असें नव्हे. समकालीन लेखांत कांहीं इतिहास आढळेल तर पश्चात्कालीन लेखांतहि कांहीं सापडेल. कोणत्याहि लेखांचें इतिहासकारानें मान्य तत्वांची चाळण लावूनच सत्यान्वेषण केलें पाहिजे. शिवाय अति-शयोक्त वा अवास्तव गोष्टी पोवाडयांत आपण ऐकल्या म्हणून त्यांचा इनकार केलाच पाहिजे अशी त्यावेळीं कोणाचीच समजूत नव्हती. समकालीन कोणता कवी राजाच्या तोंडावर त्याला मूर्ख म्हणूं शकेल? "जुनी माणसें तीं कणसाला महाग" किंवा "अजागळ ते तूपसाखर चारुनि व्यर्थ पोशिले" असें मोठा चक्राकारी तुरा शिरीं धारण करून सोंगापरी दिसणाऱ्या रावबाजीसमक्ष गाऊन दाखवणारा शाहीर दुर्मि-ळच असणार. हे पोवाडे अनंत फंदीच्या मुलाचे असून पेशवाई बुडण्याच्या आगे मागें रचले असावे हा तर्क श्री. यशवंतराव यांचा योग्य आहे. भावे या कामीं घसरले यांत शंका नाहीं. भाव्यांच्या दप्तरांत अप्रसिद्ध दुसरे पोवाडे नाहींत असें चौकशी करतां समजतें.

या कालानुक्रमानें दिलेल्या ५२ पोवाड्यांत पहिला पोवाडा अफझलखानवधा-वरील आहे. या पोवाड्याला गण आहे. ही त्याच्या प्राचीनत्वाची खूण आहे. एवढ्या सबंध पुस्तकांत गणारब्ध पोवाडे आणखी दोनच आहेत. ते नंबर ३ व ५ चे होत. अज्ञानदास, व यमाजी व मल्लारदास हे या पोवाड्यांचे शाहीर. हे तीनहि ब्राम्हण नसावे असें वाटतें. लावण्यांतून पोवाड्यांचा उद्भव झाला याचें हें द्योतक आहे. दुसऱ्या पुस्तकांतील पोवाडे पाहिले तरी पोवाड्याला नमन क्वचित्च आढळेल. शितूतांच्या संग्रहांत दत्ताजी जाधवावर जो पोवाडा आहे त्याला मात्र नमन आहे. हें नमन प्रायः गणपतीचें असतें म्हणूनच नमनाला गण म्हणतात. तथापि नंबर ३ च्या पोवाड्यांत नारायणाचें नमन आहे ( पहिलें नमन माझें देवा नारायणाशीं ). पोवाड्याच्या आरंभीं गण म्हणतातच असा नियम नाहीं. पण लावणीला आरंभ गणावांचून होत नाहीं. गण म्हणत असतां नाच करीत नाहींत. व नाच्या पोर आपल्या तोंडावरचा बुरखा काढीत नाहीं. " माझें नमन आधीं गणा " यांत गण शब्दानें गणपतीच सूचित होतो. गणपतीचें नमन ज्यांत आहे असें कडवें नव्हे. गणपतीला गण ही संज्ञा आहे. उ० पार्वतीनें तेव्हां मळीचा बनविला **गण**. अमृत शिंपूनि **गणाला** केलें साजिवंत. नेउनि **गणाला** दरवाज्यावर ठेवला राखण "

"नमियेली सारजा" यांत सारजा टाकून सारज्या पाठ कां स्वीकारला समजत नाहीं. शालिग्रामांनीं सारजा पाठ स्वीकारला आहे तोच बरा दिसतो.

देशइलाइत---यावर अधिक टीप पाहिजे होती. विलायती देश म्हणजे स्वदेश. हा देश कोणता ?

या पोवाड्याच्या दुसऱ्या चौकांत शाहीर म्हणतो " गड मी राजाचे गाईन.... धोडप तळकोंकणचे किल्ले घाटावरले गड गाईन. " अर्थात् या चौकांत वर्णन केलेले किल्ले तळकोंकणांतच असले पाहिजेत वरकोंकणांतले असूनहि चालणार नाहीं. पण बेळूर प्रांतांतील गर्जनगड, वेळगांवाजवळील पारगड आणि नाशीक जिल्ह्यांतील धोड-पगड अथवा खटाव तालुक्यांतील भूषणगड हे तळकोंकणांतले किल्ले म्हणतां येतील काय ? घाटमाथ्यावरचे किल्ले तिसऱ्या चौकांत सांगितले आहेत. मला वाटतें भर्ज-नच्या ऐवजीं कामण असावें. ठाणें जिल्ह्यांत कामणदुर्ग आहे. पारगडच्या ठिकाणीं सागरगड किंवा पेवगड सुचविण्यासारखें आहे. पेवगडाला विकटगडहि म्हणतात. हे कुलाबा जिल्ह्यांतले किल्ले आहेत. मंडनगड हा पालीजवळचा किल्ला येथें सांगणें संभ-वनीय नाहीं. "दर्यांत दिसताती दोन " या पुढील वाक्यावरून दोन गड पाण्यांतील पाहिजेत. कोरला भुईकिल्ला आहे. जंजिऱ्याच्या खाडींत बेटासारखे दोन किल्ले आहेत. त्यांपैकीं कांसा किल्ला हा एक आहे.

कुवल हें भोरिकागडाचें विशेषण आहे त्याप्रमाणें भूषण हें सुरगड-अवचित-गड यांचें विशेषण म्हणून समजण्यास हरकत नाहीं. कुर्डुगडालाहि विशेषणात्मक शब्द आहेच. तसेंच पुढें धोडप न वाचतां भोरप वाचलें तर ? सुधागड म्हणजे भोरप. हा

कुलाबा जिल्ह्यांत आहे व तो कुर्डुगडाशेजारींच आहे हे अक्षांश पाहिले असतां समजेल. शाहीर कुर्डुगडानंतर लगेच या किल्ल्याचें नांव घेतो ही गोष्टहि वरील अनुमान दृढ करते.

चौथ्या चौकांत मंडन या शब्दावरील टीप चुकीची दिसते. तळकोंकणांतील वाणकोटानजीकचा मंडनगड " घाटावरलागड " मानतां येणार नाहीं. रायगडाच्या किल्याला-तक्ताला नव्हे सोन्याच्या तीन पायऱ्या असें दर्शविणारे मुलींचें एक गाणें मला माहीत आहे. भोंडल्याचा खेळ खेळतांना हें गाणें म्हणतात. तें गाणें असें:—

रायगड किल्याला । सोन्याच्या पांच पायऱ्या ॥ ध्रु० ॥
कोंबडा आरवतो । मुंबईच्या बंदराला ।
हत्ती झुलती । वसइच्या बंदराला ।
राम हातानीं कळे तोडी ।
सीता झारीनी पाणी घाली ।
दिवाळीचीं पोर पाठीस लागती मोर ।
झेंडलोबा रे झेंडलोबा ।
तीन तांदूळ झेंडलोबा ।
रायगड किल्याला । सोन्याच्या पांच पायऱ्या ।

पांचाच्या जागीं तीन किंवा लाल असाहि पाठ आहे. चवदाताल कोंकण– सर्व कोंकण. चवदाताळ = अतिशय उंच ( mols )

**चौक ६** – "बाच्छाचें पाठविलें प्रमाण" ह्यांत प्रमाणाच्या ऐवजीं शितूत प्रतींत फर्मान शब्द वापरला आहे. हाच पाठ मूळचा असावा.

**चौक ९ व १३** – "उंबराव ताबिन चालती" ताबीन म्हणजे ताब्यांत. याला कांहींच अर्थ नाहीं. "उंबराव बिनी चालती" हा शितूत प्रतींतला पाठ योग्य वाटतो. उंबराव पुढें चालतात.

**चौक १३** – "सौदळी भांडतां"- चौदळीं भांडतां असें असावें. चौदळ—चार दळें. चतुरंग सेना भांडावयाला असतां असा अर्थ.

"मग कणकीला मीठ किती" याचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं. "मग मीठकणीला वेळ किती ?" असें असावें. मीठ कणी याचा अर्थ मोल्सवर्थ असा देतो. (1) The salt waived around the head of a child or an animal on its return home from any place; to remove the influence of an evil eye; (2) also the ceremony of so waiving. चतुरंग सेना लढावयास असतां यश येईल यांत शंका काय ? हा भावार्थ. फौज लढाई जिंकून परत आली तरच तिच्यावरून मीठ ओवाळून टाकतील. नाहीं तर नाहीं.

**चौक ३७**—शंकपाळ = संकल्प ?

पोवाडा २

चौक ५ -- " दो धन्ये एकच ठायीं--मारावा कोणाला " यांत धन्य म्हणजे धनी हें बरोबर आहे. पण नारायणरावाला मारल्यानंतर दोन धनी कोठें राहिले. ?

आणि शिवाय याच्याच पुढील "मारावं कोणाला" याचा संबंध कसा लावावयाचा ? नारायणरावाला संपवून राघोबादादांची द्वाही फिरल्याचें आधींच शाहीर सांगतो. मला वाटतें " दो धन्ये एकच ठायीं- मारावं कोणाला " हें वाक्य तुळाजी खिसमतदार झाला बोलता " याच्या पुढचें आहे.

चौक ४ -- " महादेव बोलला सवाई शास्त्र चढले वेदाला " शास्त्राला ज्याप्रमाणें वेदाचें प्रामाण्य प्राप्त झालें त्याप्रमाणें सदर पोवाड्याला प्रामाण्य प्राप्त झालें, असा अर्थ श्री. केळकरांनीं दिला आहे. माझ्या समजुतीनें हा अर्थ चूक आहे. शाहीर मुंजीचें वर्णन करीत आहे. तो म्हणतो सवाई महादेव-सवाई माधवराव शास्त्र बोलले -शिकले ( तसेंच ) वेदाला-वर--पडले ( चढले नव्हे ).

हा खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा आहे. यांत अनेक पशु, पक्षी व वृक्ष यांचीं नांवें आलेलीं आहेत. त्यांची माहिती जंगली शिकारी लोकांकडून मिळविली पाहिजे. पुस्तकांतून ही माहिती मिळण्यासारखी नाहीं. त्यांपैकीं मला जी माहिती मिळाली ती येथें देतों.

मेंडशिंग अथवा मेढशिंग हें एक झाड आहे. हें मोठें असतें. त्याला शेंगा येतात. त्या कडू असतात.

थोकर-टोकर=बांबू. कळक

धावड्यालाच धामोडा असें कित्येक म्हणतात.

झगड- मूळ शब्द शकट असावा. शकट हा बहिरी ससाण्यासारखा असतो.

बिबे- बिबल्या ? ( पु. ) हा कोंबडीं खातो.

रात्रजळी नांवाचें झाडच आहे. बदलापुरच्या नदींत पावसाळीं पुरांत लांकडें कधीं कधीं वाहून येतात. तीं रात्रीं प्रज्वलित झाल्यासारखीं दिसतात. कित्येक लोक स्वतः पाहिल्याचें सांगतात. त्या लाकडांचा चांगला उजेड पडतो. मला ज्या कातकऱ्यानें हें सांगितलें तो म्हणाला कीं हें झाड आजापर्वतावर असतें. अजविलापाशीं तर या आजापर्वताचा संबंध नसेल ?

गाळा--जंगली झाड. याच्या फळांच्या बिया काढून पाण्यांत टाकल्या तर मासे मरतात असें म्हणतात.

कलपोट--कालापोटया म्हणजेच कलपोट असेल तर हा एक कावळ्यासारखा पक्षी आहे. पण कावळ्याहून लहान असतो.

खिरण्या--खेरणी नांवाची लहान बुटकीं झाडें असतात. त्यांना फुलें येतात. हा शब्द सगनभाऊच्या लावणींत आला आहे. गुलछबू, गुलटोप, मोतिया, मोगरा, शेवंती, नारंग्या, खिरण्या, तुती...ज्या पुष्पाची आवड तुम्हाला शेज करिन सज्जना.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

## रूपरेखा.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका नांवाचें महाराष्ट्र साहित्य परिषदेचें मुखपत्र पूर्वी ६-७ वर्षे विविधज्ञान विस्ताराच्या जोडीनें कधीं दरमहा तर कधीं तिमाही या प्रमाणें प्रसिद्ध केलें जात असे. परंतु तें अलीकडे दोन वर्षें बंद पडलें होतें. मध्यंतरीं तें नाशिकास स्वतंत्रपणें काढण्याची योजना ठरली होती, परंतु ती योजना सफळ होईना. तेव्हां ता. १३-१०-२७ रोजीं भरलेल्या वार्षिक साधारण सभेंत पुनः एकदां या गोष्टीचा विचार होऊन साहित्य पत्रिका स्वतंत्र रीतीनें शंभर पानांचें त्रैमासिक म्हणून काढावी असें ठरलें. त्याचवेळीं हें त्रैमासिक परिषदेच्या सभासदांना फुकट व इतरांना चार रुपये वार्षिक वर्गणी घेऊन देण्यांत यावें असा ठराव झाला. महाराष्ट्र साहित्य परिषदेचें मुखपत्र या नात्यानें हें त्रैमासिक चालवावयाचें असल्यामुळें शक्य तें तितकें वरच्या दर्जाचें असणें अवश्य आहे व त्याच दृष्टीनें साहित्यसेवकांच्या माहिती करितां योजनेचें तपशीलवार दिग्दर्शन पुढें दिलें आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें एक स्वतंत्र मासिक असावें अशी प्रत्येक साहित्य-भक्ताची उत्कट वासना असणें जसें अगदीं स्वाभाविक आहे, तसेंच तें मासिक त्रैमासिक, अगर षण्मासिक–असेल तें-पहिल्या प्रतीचें असावें, उत्कृष्ट इंग्रजी मासि-कांत बसण्याचा त्याला मान मिळावा, असें वाटणेंही स्वाभाविक आहे. परिषदेचें मासिक हें तिच्या लौकिकास साजेल असेंच पाहिजे हें उघड आहे. परिषदेचे सभासद जे साहित्यसेवक त्यांच्या विद्वत्तेचा हें मासिक म्हणजे एक थर्मामिटरच आहे अशा दृष्टीनें त्याच्याकडे सर्व लोक पाहाणार व तें योग्यच आहे. या गोष्टीनेंच इतर मासिकां-हून या परिषदेच्या मासिकाचें भिन्नत्व व वैशिष्ट्य स्थापित होतें. परिषदेचें मासिक जर सामान्य प्रतीचें निघेल तर महाराष्ट्रांतील सर्व विद्वानांना हें लांछनास्पद होईल, यांत संशय नाहीं. अशा प्रकारचें मासिक काढणें हें एकट्या दुकट्याचें काम नाहीं. मग तो स्वतः कितीही विद्वान् असो. अशा मासिकास अखिल महाराष्ट्रीय साहित्य-भक्तांचें साहाय्य पाहिजे. नुसत्या सहानुभूतीनेंही काम भागण्यासारखें नाहीं. हें साहाय्य मिळणें क्रमप्राप्त आहे, कारण हें मासिक कोणत्याही व्यक्तीच्या खाजगी मालकीचें नसून परिषदेच्या मालकीचें आहे; परिषदेच्या प्रत्येक सभासदाच्या माल-कीचें आहे. आणि महाराष्ट्रांतील प्रत्येक साहित्याभिमानी परिषदेचा सभासद होऊं